# वही क्रमांक १: रंगवीन वैखरीस, वरद हस्त हा शिरीं

**काव्य संग्रह कृति : श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी एम ए (संस्कृत , AMU 1927)**

## Table of Contents

# "रंगवीन वैखरीस, वरद हस्त हा शिरीं"

काव्य संग्रह कृति : श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी **एम ए (संस्कृत , AMU 1927)**



email:atul.pantojee@gmail.com

प्रथमावृत्ती:२०२४ ( चैत्र शुक्ल नवमी १९४६ शके )

प्रस्तावना

सदर कृति श्रीयुत रामचंद्र वामन पंतोजी ( जन्म: 1892, देवलोकगमन: 29 डिसेंबर 1974) , एम ए (संस्कृत , AMU 1927) ह्यांचे उपलब्ध असलेल्या दोन हस्तलिखित वह्यांचे तंतोतंत पुस्तकीकरणाचे प्रयत्न आहे. यांत संस्कृत आणि मराठी काव्य आहेत.

रचनाकाराचे अल्प परिचय खालील प्रमाणे आहे.

ग्वाल्हेर राज्यात वास्तव्यास असलेल्या श्रीयुत वामनराव पंतोजी कुटुंबातील ते मधले अपत्य होते. पिढीजात शिक्षकी वृत्ति मध्ये 3स्वतःला ओढून, 30 वर्षे तत्कालीन ग्वाल्हेर राज्यातील ग्वाल्हेर, उज्जैन , मंदसौर व गुणा ह्या ठिकाणी ते शिक्षक आणि नंतर हेडमास्टर राहिले. वयाच्या पस्तीसाव्या वर्षी अलीगढ मुस्लिम यूनिवर्सिटी येथून प्रायवेट एम ए सुद्धा केले.

1942 पश्चात सेवानिवृत्ती नंतर शुजालपुर च्या मंडी समिति हाई स्कूल मध्ये मुख्याध्यापक राहिले. त्यानंतर उज्जैन येथील उद्योजक श्रीमान लालचंद सेठी यांच्या आग्रहास्तव 1947 ते 1974 पर्यन्त इंदूर येथे त्यांचे नगरश्रेष्ठी बंधु श्री भंवरलाल सेठी (मेसर्स बिनोदी राम बालचंद, बँकर्स अँड ट्रेजरार बॉम्बे बरोडा अँड सेंट्रल इंडिया रेल्वे) यांच्या कुटुंबास शिकवण्यासाठी ट्यूटर-गार्डीयन होते.

सदर कृति साधारणपणे १९२८-१९३५ च्या काळात लिहिली गेली आहे.

## प्राक्- कथन

वही क्रमांक एक मध्ये ९६ कवितांचे संग्रह आहे. काही कविता वेगवेगळ्या संमेलनांसाठी आणि समरोपां साठी केल्या आहेत. घरगुती प्रसंगावर बरेचसे काव्य आहेत. राजाश्रयी असल्यामुळे प्रासंगिक काव्य सुद्धा आहेत. तत्कालीन राजकीय घडामोडी वर काही सुचलेल्या कविता आहेत.लहान मुलांस अक्षर बोध करवीत असतां मनातले भाव "श्री शारदे चा  आशीर्वाद" कवितेत स्फुटित झाले आहे. या संग्रहाचे शीर्षक ह्याच्या शेवटल्या पंक्तीत आहे.

- गोड शीर्षक असलेली कविता आनंद च्या १९३२  खास दीपावली अंकात प्रकाशित झाली.
- मोहन  शिष्टाई कवितेत गांधी यांचे गोल मेज परिषदेत (१९३० -३२ ) गेल्याबद्दलचा  विषय रंगवला आहे.यात स्वराज्य आता मिळणारच ही  उत्कट आस्था उंचीवर दृष्टिक्षेपात ठळकपणे उजागर होते.
- लपंडाव  शीर्षक असलेल्या कवितेवर एक रसिकाचे आलेले  पत्र सोबत दिले आहे.
- वही क्रमांक दोन उपलब्ध नाही.
- पण  वही क्रमांक तीन वेगळ्या पुस्तकाकारात या सोबतच प्रकाशित होत आहे .
- हस्तलिखित अनुक्रमणिका सोबत सुरवातीला एक वेगळी टेबल ऑफ कंटेंट क्विक हायपरलिंक युक्त दिली आहे. त्यावर क्लिक करून त्या कंटेंट वर सत्वर वाचता येईल.
- कोष्टकांत खाडाखोड किंवा अस्पष्ट असलेल्या नोंदी आहेत. काही चुका असणे शक्य आहे, त्या अवश्य सूचित करा . त्यावर योग्य ते सोपस्कार करता येतील.

हुबेहूब वही मध्ये असल्या प्रमाणे पुस्तक केले आहे.

- संपादक

## अनुक्रमणिका

# शुभचिंतनम्

कूजद्भिर्विहगै: प्रशान्तसमये कुञ्जेषुनीडाश्रयैः।

सौन्दर्यं कलकण्ठ निर्गतरवैः प्राभातिकं वर्धितम् ।।

मन्येनूपुर किङ्किणी झण झणं नूनं हि नृत्योत्थितम् ।

माङ्गल्यं विदधातु विभ्रमपदं नैसर्गिकं नर्तनम्। ||१||

उद्यद्बालरवेः श्रियं सुमधुरामानन्दनीं  चेतसाम्।

प्रेक्ष्यन्तां सुजना निसर्ग रूचिरां सृष्टिं समुल्लासिनीम् ।।

प्राप्तव्यं सुपदं यया द्युतिमयं यत्नैः सुसाध्यक्रमम् ।

बालानां सुमनः सु सावितरतु स्वौजनीं  संपदम् ।।२||

श्रीमज्जॉर्ज जयाजि बालनृपतेः सच्छासनाधिष्ठिते ।

श्रीमन्माधवपूर्वके विरचितं विद्यालये पुस्तकम् ||

अल्पैषाद्रियतां कृतिः सहृदयै बीलार्क तेजोनिभा।

प्रागल्भ्यं च ददातु तां सुकृतिनां दृष्टिर्जगन्मङ्गला ।।३।।

नित्यं रक्षतु बाल जीवन कलां श्रीवासुदेव: स्वयम्।

शक्तिं रक्षतु बालक प्रियतमः सिंहाभिधीनो हरिः।।

बुद्धिं संयमताञ्च संयमपरो नारायणो यच्छतु।

तत्प्रज्ञाप्रतिपद्यतामविचलां सौहार्दतां शुक्लताम्।।४।।

कल्याणीमभयङ्करः स्थिरमतिं श्री शंकरो यच्छतु ।

सद्भावोन्नततां त्रिलोचन हरो  दत्तांच तेजस्विताम्॥

नीयन्तां शिव भालचन्द्र सुकरैर्निर्विघ्नतां स्वस्थताम् ।

बालाः प्राप्नुवताञ्च संस्कृतपदं रामप्रसादाच्छुभम् ॥५॥

**प्रकाशन- माधव कॉलेज मॅगेझीन ,अङ्क-नोव्हेंबर १९३०**

## शारदा- वन्दनम्

(राग -भैरव- त्रिताल)

वन्दे शारद शशिवदनाम्, छबि सदनामुज्ज्वल तारक रदनाम् ॥ध्रु.॥

स्मित विलसितमुखसित कमलाम्, फुल्लोत्पलदल विकसितनयनाम् , वीणावादनलीला लीनाम् ॥ १ ॥

मेघाडम्बर रहिताम्बरडम्बर निर्मलाम्बर धरिणीम्, विश्वव्यापिनीमशरण- जनजननीं वाङ्मयदेवीं मतिमलहरणाम् ॥ २ ॥

('शारदावन्दनम्' - मध्यभारतीय कवि सम्मेलनाच्यावेळीं)

## टरटरों टरों ट्रोंटरों टरों रवः

जयतु ते मुने द्रों टरों ध्वनिः ।
नदति तुन्दिलो दर्दुरो महान् ॥
श्रुतिमयीं गिरां श्रुतिमनोहराम्।
श्रृणुत ट्रोंटरों श्रेयसीं पराम् ॥ १ ॥

रचितमण्डलान् बालपण्डितान् ।
उपदिशत्ययं सद्गुरुपमः ॥
रटननिर्भरां प्रश्रयान्विताम् ।
श्रुणुत ट्रोंटरों संयुताम् गिरम् ॥ २ ॥

मधुरगायनं किंनु शिक्ष्यते ।
अतिसमाहितेनैवचेतसा
कलरवैकतामेकतालताम्
श्रृणुत पल्वले ट्रोंटरोंमयीम् ॥ ३ ॥

सकल सैनिकान् व्यूहसंस्थितान् ।
वदति कॉशनं किंनु कॅप्टनः ॥
गमनलाघवं प्लुतिषुपाटवम् ।
प्रकटितं तदा ट्रोंट्र संगतम् ॥ ४ ॥

विकिरितेऽम्बरे मेघमण्डले।
सपदि पल्वले निर्जलस्थिते ।।
अहह दीनतां क्षीणतां गतः
टरटरोंटरों ट्रोंटरों रवः ॥ ५ ॥

प्रकाशन - माधव कॉलेज मॅगझीन
अङ्क - १९३१

## कालिदासस्योक्तेः समर्थनम्

एकोहि दोषो गुण सन्निपाते ।
निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ।।
-कालिदासः

एकोहि दोषो गुण सन्निपाते।
निमज्जतीन्दोरितियोबभाषे ।।
नूनं न दृष्टीनं कविनापि तेन ।
दारिद्र्य दोषो गुण राशिनाशी ।।
– प्रतिवाद रूपमन्यत्सुभाषितम्

दारिद्र्य दोषोऽपितनोति लक्ष्मीम् ।
उपैति यो मोहन गन्धवत्वम् ॥
यः क्रन्दनैर्दुःखित बांधवानाम् ।
कौपीन खण्डं दयया दधानः ॥

- कालिदासस्योक्ते : समर्थनम्

**प्रकाशन - माधव कॉलेज मॅगेझीन**

**अङ्क - १९३२**

(Comment: prativad - 'एक दोष गुण समूह में दब जाता है यह कहनेवाले ने यह नहीं देखा कि दरिद्रता एक ऐसा दोष है जो अनेक गुण समूह को नष्ट कर देता है ।')

## दरिद्रनारायणः

(श्रीमतां गांधी महोदयानां कारागृह नियंत्रण दिने रचितम्)

अबान्धवानां हृत काञ्चनानाम् ।
अकिञ्चनानाम् व्यसनार्दितानाम् ॥
क्षुत्पीडितानाम् कृशभावनानाम् ।
आलम्बनाभाव समाकुलानाम् ॥ १ ॥

नियन्त्रणः कुण्ठित मानसानाम् ।
निरुद्ध बाष्पो दयलोचनानाम् ॥
तामिस्त्र लोकेष्विव पातितानाम् ।
दरिद्रनारायण एव देवः ॥ २ ॥

लक्ष्मीपतेः किंनु सभाजनेन ।

यो निद्रया वा रमया विमुग्धः ॥

बिभर्ति लक्ष्मीममितां दयालुः ।

दरिद्र नारायण एव देव : ॥३॥

नमामि तत्पङ्कजपादयुग्मम् ।

श्री पङ्कजायाः परमं निधानम् ॥

यद्भारतीयं व्यसनाब्धिपोतम् ।

आनंदकन्दं भव वन्दनीयं ॥ ४ ॥

भवेत्सनित्यं मम वर्म रूपः ।

क्षीणाङ्गकानां विवृतात्मशक्तिः ॥

विस्तार्यतां मोहन दिव्य तेजः ।

यद्बन्धनोच्छेद करं भवस्य ॥ ५ ॥

Google translated meaning
असंबंधितांकडून चोरीला गेलेले सोने. ते गरीब आहेत आणि व्यसनाधीन आहेत.
ते भुकेले आहेत आणि पातळ वाटत आहेत. आधार नसल्यामुळे ते भारावून गेले आहेत. १ ॥
निराश मनावर नियंत्रण. दयाळू डोळ्यांचे अश्रू आवरले.
ते अंधाराच्या जगात पडलेल्या लोकांसारखे आहेत. गरीब नारायण हा एकमेव देव आहे. २ ॥

लक्ष्मीपती (च्या) लोकांचे काय? जो निद्रा किंवा आनंदाने मोहित आहे.
त्याच्याकडे अफाट संपत्ती आहे आणि तो दयाळू आहे. बिचारा नारायण देव आहे.॥ ३॥

त्या कमळाच्या पायाच्या जोडीला मी नमन करतो. श्री पंकजाचा सर्वोच्च खजिना.
प्रतिकूलतेच्या महासागरात हे भारतीय जहाज आहे. परमानंदकंद, पूजेस पात्र व्हा. ४ ॥

ते सदैव माझे ढाल स्वरूप असेल. क्षीण झालेल्या अंगांची आत्मशक्ती प्रगट होते.
विस्तार, मोहन, दैवी तेज. भौतिक अस्तित्वाची बंधने तोडणारा तो हात. ५ ॥

# 'ननु लाभोहि रुदितम्'।

उ. च.*

मृतवीर शवं गृहं हृतम्।
रुदनं सान चमूर्च्छनां गता ॥
अवलोक्य वदन्ति बालिकाः।
अधुनारोदन विध्नजीवनम्॥१॥
मृदु मञ्जुल शब्द सुन्दरम्।
स्तवनं प्रस्तुतमे व तस्य 'सः ॥
जगदेक सुवीर्य सौहृदः'।
चलितं तत्दृदयं नवाक्त्वपि॥२॥
अतिमन्द पदोत्थिता सखी।
निकटे तस्य शनैर्गता तया॥
वदनावरणं निवारितम्।
नमनाक् वाङ्न मनस्तु चालितम्॥ ३ ॥
जरठात्युपमातृका तदा।
शिशु मङ्के तदनुन्यवेशयत्॥
बतचलितनेत्र दुर्दिनम्। 'अहमर्थे तव बालकध्रिये '

* Footnote: 'Home they brought her warrior dead– एतत्पद्यमत्र गीर्वाण भाषान्तरितम्

Original Context: "Home they brought her warrior dead"

Alfred, Lord Tennyson (1809–1892)

From "The Princess"

HOME they brought her warrior dead:
She nor swooned, nor uttered cry;
All her maidens, watching, said,
"She must weep or she will die."
Then they praised him, soft and low,
Called him worthy to be loved,
Truest friend and noblest foe;
Yet she neither spoke nor moved.
Stole a maiden from her place,
Lightly to the warrior slept,
Took the face-cloth from the face;
Yet she neither moved nor wept.
Rose a nurse of ninety years,
Set his child upon her knee,—
Like summer tempest came her tears,

"Sweet my child, I live for thee."

# स्फुटपद्यानि

:

*** (श्रीमतां आपटे इत्युपनाम धारिणां गोविन्दराव जी ना माधव कॉलेज मुख्याध्यापक) दिनाङ्क ५-४-१९३४**

विज्ञाने विमलां प्रदीप्तमतितां शास्त्रेषु सम्पन्नताम् ।

साहित्ये रसिकां रुचि प्रवणतामुच्चेषु भावेषुवा ॥

तेजोगोल विहारिणी च सुमति विव्दज्जनानंदनीम् ।

गोविन्दे सममेव पश्य युगपच्छ्रेष्ठाय तस्मै नमः ॥१॥

संध्या रागेण रक्ताधर युगल धरां दिङ्मुखी पुञ्जकान्तिम्।

ताम्बूलं भक्षयित्वा दयितमभि सरन्तीं द्यामिनीं कामिनीं च ॥

दृष्टवा लीला विलासान् वन मृग मिथुनो द्वेलित भ्रूलतानाम् ।

धिक् धिक् स्वैश्वर्यमत्त्वं वनभटति रुदन् रोदयन् रामचंद्र: ॥

पृथ्वी संयमतां समुन्नतपदं भूषाय हैमोगिरिः

गांभीर्यं जलधिर्बलंच पवनश्चंड प्रताप यशः

भास्वान्नपर्यतां मति प्रखरतां नेत्र द्युतिं वर्धयन्

चंद्रश्चेतसि चंद्रिकांच वितरत्वांल्हादिनीं संपदम्

(दृष्टं) प्राप्तं चिरादपि सुमित्र तवाद्य पत्रम् ।

अद्य प्रगे मृदुल मुज्जवल कान्ति (भाव) गर्भम् ॥

विस्तारयत् प्रतिपदं श्रियम व्दितीयाम् ।

हृत्पंकजं (तदनु) मित्रकंरण फुल्लम् ॥

## ॥ समस्यापूर्ति ॥

स्फुटित कुमुदिनी नां लास्य हास्यप्रभावैः

विरह विकल चेतस्तप्त मेतत्तु किंचित्

हिमकर शशिना मन्मानसे बिंबरूपम्

अजनि रजनि मध्ये मंडलं चंद्र रश्मेः ॥

मधुमयी स्तवदश्रु विलोचनी

दश दिशोत्थरजः कण धूसरा

गत धवा तरुणी पथि बंधुषु

कमलिनी मलिनी (मलिना) कमलाकरे ॥

फुटनोटः 2= मेरो: स्वर्णमये ऽ धिरुत्य शिखरे  त्वं भासयन्ती दिवम्

1= धृत्वा वाङ्मयरत्न गर्भमुदरे गीवनपातः (मातः?) पुरा

तस्मादुन्नत सानुतः सुरसरितुल्योऽवपातः स्तव

प्रागैतिहास काले किंवा जगत्प्रभाते

प्राचीललाम भूते यं भारताख्य भूमिः ॥१॥

तस्या हिमाद्रिकूटं मुकुटं सुरञ्जिताग्रम्

रचितो विशालवृक्षैः वेणी कलापबन्धः ॥२॥

पवनेरितै स्तरङ्गैर्गाङ्गै श्च सैंधवैश्च

वदनं लसत्तुषारैः रमणीय कालदेशम् ॥३॥

भ्रूपक्ष्यपंक्तिभूता काश्मीर कुंकमालिः

फुल्लोत्पले च नेत्रे तत्पाट लौ कपोलौ ॥४॥

वेल्लत्सरिद्गुणोयं कल्लोल लोलमालः

पंजाब कण्ठ देशः प्रकृतेर्निधान गर्भः ॥५॥

प्रत्यन्त पर्वतानां पंक्ति प्रलम्ब हस्तौ

विंध्याद्रि बालरूप: क्रीडन्नुर: स्थलेऽयम् ॥६॥

तापी तथैव रेवा विलसत्तरङ्गितांग्वौ

सप्ताद्रि मेखलायां रजलांचले तटिन्दौ॥ ७ ॥

तत्सागरांबराया जलधे जलैन देव्याः

प्रक्षालितांघ्रिपद्मं कन्या कुमारिरूपम् ॥ ८ ॥

एवंविधा धरित्री धनधान्य ऋद्धिगर्भा

सृष्टेर्विलास हन्सैर्विविधैर्नितान्तरम्या ॥९॥

विद्याकला कलानां प्रभया विराजयन्ती

आसीद्यदा प्रतीची गाढं तमो निगूढा ॥ १० ॥

नेमिक्रमेण भूमेर्भ्रमणा द्विवर्तनेन

प्राची शनैः शनैः सा तिमिरावृताचजाता ॥ ११ ॥

हन्त प्रवर्तितं तद्बालार्कशासनं तु

प्राची पुनः प्रभाते येन प्रभासमाना ॥ १२ ॥

प्राच्यालये नवीन प्रभयान्वितां वसन्तीं

तां भारतीय देवीं सम्मानयन्तु सर्वे ॥ १३ ॥

श्रद्धोपहार हारैः ग्रंथांदिरत्न गर्भे

प्राचीन संस्कृतेस्तु भूयान्नवावतारः ॥ १४ ॥

नाना कलोद्यमानां मुज्जीवनेन देवी

आप्नोतु तत्पदं यत् देवैः प्रलोभनीयम् ॥ १५ ॥

# जननीहृदयम्

जय जय जननी हृदयम् विमलम् ।

विकसितदल नव सुमामिमृदुल म् ॥ध्रु०॥

किल्मिषहरणं सन्मति सदनं

गूढ निगुञ्ज त्प्रणय वितानम् ॥

विघटित तिमिरं द्युतिमय गगनम्

परिमलपूरित चिद्धन पटलम्॥१॥

क्षुधया पीडित बालकवृन्दाः

व्यसनज्ञातरै भिभूता मन्दाः

तेषामुद्धत करुणाक्रन्दाः तैस्तैरलैर्भव वीचि विलोलम् ॥ २ ॥

पायय पायय पयसांधारा: संचित चन्दन शशि घनसाराः

वर्षत्त्वविरत शुभरससाराः

शिशुगण हृदयम् तर्पय विकलम् ॥ ३ ॥

प्रवाहयैवं  पयः प्रवाहान् विकासयन्नवनवस्वभावाम्

प्रशमित् शिशु हृदयान्तर दाहाम्

वितरतु मङ्गलमूलं शीलम् ॥ ४ ॥

कैलासे शिखरे यशोधवलिते संस्थिता भारती पुरा।

दैवी विस्तार्यामृत माधुरीं प्रतिपदम्  मातर्जगन्मंगले॥

तस्मादुन्नत सानुतः सुरसरित्तुल्योऽवयात स्तव।

क्षारोध पुरतः अधुना समर्पित गुणा सा, देवी का ते गतिः॥

संसारे कः पदार्थाः तृप्तमेव विरसा इन्द्रजालेन यस्या:

जायन्ते दिव्यरूपाः सुकृतिकवि कृतैर्घो तदन्तोऽन्तरङ्गम्

भावा उन्मथ्यमाना ननु अपि नव रसतां नीयमाना यदैषा

अव्युत्पन्नैरगम्या जयति विजयिनी साहि साहित्यरीति

## समस्यापूर्तिः

शेते श्रुतं तरुवर मित बीजागर्भे
शेते श्रुतं जगदिदं पुरुषैक नाभौ
ग्वाल्हेर पंडितवरैः श्रुतमेवमेतत्
शेते करी मशक पाद विपादिकायाम्॥ १॥
करदल रजो मलिनाम्बरा
विकासतैर्वदनै: शिशुभिर्वृत्य
स्थितवती तरुणी तटिनीतटे
कमलिनी मलिनी कमलाकरे॥ २॥

# मयूरवाहिनी

मेघाडम्बर पङ्किलम् ह्रद नभं नीलं नभो निर्मलम्
भूम्यन्तः प्रतिबिम्बितम् समुदितं चैतच्छर द्वैभवम्
रम्ये तद्गगने मयूरसदृशे श्रीशारदा चंद्रिका
रूढा चंद्रकपिच्छ तारक युते ध्वान्तं हृदि ध्वंसताम् .

संवत १९३७

धवल कचकलापे जाह्नवी फेन (तुल्यम्) पुञ्जम्
शिरसि विमलपट्टं वेष्टनं यो दधानः
वपुषि विमलकान्तिः श्वेतवस्त्रंवसानः
किमु समुदित गङ्गा नन्दनस्यावतार:
जयति जयति भीष्मो मन्दसोरान्तवासी वपुषि मनसि बाह्येनान्तरङ्गेन शुद्धः
भवभयरहितोऽयं भावलग्नः परेशे
जय जुगलकिशोरः स्वामिसेवानिवृत्तः

Google Translation जान्हवी फोम (समतुल्य) पांढऱ्या काचेत ज्याने डोक्याभोवती स्वच्छ कापड गुंडाळले आहे त्याच्या अंगावर शुद्ध चमक होती आणि पांढरे कपडे घातलेले होते गंगा नंदन नदीचा अवतार काय आहे:

विजय, विजय, भीष्म, संथ गतीने चालणारा शेवटचा निवासी, शरीर, मन, बाह्य आणि आंतरिक शुद्ध तो मृत्यूच्या भयापासून मुक्त होतो आणि परमात्म्यात लीन होतो जय जुगलकिशोर हे त्यांच्या स्वामिच्या सेवेतून निवृत्त झाले

श्री गणेशाय नमः

***(' ग्वालियर राज्य महिला कॉन्फरंस ' १९३१ करितां लिहिली.)**

जय जय जय जय मंगलदायक

मनभावन पावन सिहिखविनायक ॥ ध्रु० ॥

अबला महिला सबला करूनी ।

चालवि आम्हा हातीं धरूनी ॥

सहाय जगतिं न तुज विण कोणी ।

भगवन् होई अमुचा नायक ॥ १ ॥

बुद्धिहीनस्त्रीजाति बोलती

उक्ति करू नी पूर्ण फोलती

मुक्यासि वाचा कुमतिस सुमती

देशी तूं प्रभु विघ्न विनाशक ॥ २ ॥

वाग्देवी तूं आई येई

दृष्टि असो तव मंगलदायी

मुक्या जिवांना वाणी देई

आई प्रेमे गाणीं गाई

युवतिजनानां संतत तारक

तुझीच दृष्टि असो तव विघ्नविनाशक

# स्वागतपर पद्य

***(ग्वालियर स्टेट टीचर्स कॉन्फरंस १९३० करितां लिहिलं)**

(राग- आसावरी - त्रिताल)

स्वागत स्वागत सकलां सुजनां

करितो आम्ही प्रेमें नमना ॥ ध्रु० ॥

उदार निर्मल अपले मानस

सुभावनांचे आगर राजस

मानिल नचकीं क्षुद्र चुकास

माना अपलें आमुच्या सदना॥ १ ॥

विचार - विनिमय - मूलक ज्ञान

तैसें बोधामृत शुभ पान

देउनि करणें अजाण जाण

पावो एवं अन्धहि नयना ॥ २ ॥

## शारदावन्दन

(राग -भैरव- त्रिताल)

***(मध्यभारतीय महाराष्ट्र कवि संम्मेलनात  म्हटलें गेलें)**

प्रगट शारदे हो , अभिनन्दन ।

करितों आम्हीं तव पद - वन्दन ॥ ध्रु० ॥

वीणा - कण्ठें मञ्जुल गायन

पावन जननी , वीणा-वादन

वाजिव झुणुं  झुणुं झुणुं झुणुं पैंजण

होइल सहज दुःख निकन्दन ॥ १ ॥

नादें भरूनी जनहृन्मण्डल

पसरवि जिकडे तिकडे मंगल

बुडवी सर्वही मोह अमङ्गल

गाढ तिमिरमय तुटुंदे बंधन ॥ २ ॥

## स्वागतपर पद्य

(राग-सारङ्ग-त्रिताल)

*** कवि-सम्मेलना करितां लिहिलें २५-१२-१९३१**

वंदन सुकवन रसिक मिलिन्दा
स्वागत स्वागत सहृदय वृन्दां ॥ ध्रु० ॥

विचार सुन्दर सरस भावना

स्फुरती जेथें विविध पावना

कविमानसें सुखवो सुजना

पावो सकल अमन्दानन्दा ॥ १ ॥

गुंफूनि नाना - कवना - सुमना

मधुर मनोहर करूनी रचना

काव्य सौरभें भारा सुमना

पाजा तुम्ही काव्य म(क) रन्दा ॥ २ ॥

काव्य - कुञ्ज - पिक - कवि - रव - कूजन

श्रवणामृतें श्रवणीं सेवन

करूनि परस्पर हेंच समर्पण

जनीं जनार्दन सर्वहि वन्दो ॥ ३ ॥

# मूक -भावना

स्वजननी ज्वर पीडित जाहली।
हुडहुडी भरली रडुं लागली ।।
रजइ एक पुन्हां दुसरी वरी ।
वरि वरी पडल्या बहु सत्वरीं।।१।।

बघुनि हें निजकेश न सांवरी ।
फिरत घाबरि बाळ भिरी भिरी।।
तळमळे बघते निज माय ती।
क्षणिं उभी क्षणिं अंगणिं  जाय ती।।२।।

वरि वरी मग आंतहि जाऊनी ।
क्षणभरी बघते टक लाउनी ।।
स्फुरत ओंठ  परन्तु न ये  रडें ।
(विकलती दिसली उर हे उडे ।।४।।)
मुख दिसे अति शुष्क जसा गडू ।।३।।

हृदयिंच्या अतिकोमल भावना।
मुखिं तिच्या दिसल्या कविच्या मना।।
परम सूक्ष्म निरीक्षण त्या क्षणीं।
करित मी मग बाळ सुलक्षणी।।४।।

जवळिं येत प्रभा मग बोलते ।

करूण मूक मनोहर बोल ते ।।

गंहिवरून गळा पण येतसे ।

भगवदे वच जें मुखिं ये तसे ।।५।।

दादा बघा समयिं  या करि काय माई।

- ती आपल्या जननिला म्हणत्येत न आई – ।।

हें बोलतां चमकले नयनांत बिंदू ।

आली तिथें रडत  रांगत बाळ इंदू ।। ६।।

मी घेतले कळवळून मनांत बाळा(ला)।

रक्षीं मुलां स्थितित या म्हटलें कृपाळा(ला)।।

बोले प्रभा बिलगुनी मज दीन वाणी ।

' डोळ्यांत कां मम  असे पण येत पांणी ' ।।७।।

—---

## 'देवा पुढें कधिं (मी) नमणार नाही'

जोडी प्रभे कर, शिरा लववून देवा।
होतां सकाळ म्हण बाळ ' खुशाल ठेवा ' ॥
माता पिता वडील नंतर त्वां नसावें।
प्रेमे प्रभा करित हर्ष मनीं न मावे ॥ १ ॥

' राही खुशाल ' म्हणती तिज सर्व मोठे।
वाटेच गम्मत तिला हंसु येते मोठें॥
जीजी हंसे परि म्हणे न 'खुशाल राहो '।
' जा! जोडणार ' म्हणत्ये ' तुज हात नाही' ॥ २ ॥

झाले पुढें दिवस चार करी तसेंच।
' देवास जोडिन न हात' म्हणे असेंच॥
' कां बाळ ! देव म्हणजे सगळयांत मोठा ।
तू हट्ट हा धरू नये अगदींच  खोटा' ॥ ३ ॥

' मी वेळ पुष्कळ जरी नमते तयाला ।
राही तिथेंच उभि जोडुनि मी कराला ॥
कां तो मला तरि म्हणेन' खुशाल राहों'।
देवा पुढें कधि पुढें नमणार नाही ॥ ४ ॥

------------

## 'दादा,न येईल रडें मग हो कसें हे'

आली परी रडत एक दिनीं प्रभा ती ।
मी पाहिलें नच तिला रडतां प्रभातीं।।
जेव्हां उठे हंसत फेंकत दंत-कांती ।
अत्यंत खिन्नमन ही मिळवी प्रशान्ति।।१।।

पोटासि लावुनि तिला कुरवाळुनी ही।
'कां बाळ! सांग पुंसलें रडशी अशी ही।।
कीं मारीलें तुज कुणी मज नांव सांग।
त्याचेंच बांधु घर काय उन्हांत का ग' ।।२।।

'दादा, तुम्ही म्हणत(अ)सां न कधीं रडावें।
लागून ठेंच पडलें तरिही हंसावें ।।
न्हातां तसें बघितलें कधिं मी रडेना।
जीजी मला चिडवित्ये पण मी चिडे ना।।३।।

आणूनि ट्रंक मज काल तुम्ही दिली जी।
त्याच्यावर 'कमल' नांव लिहीत जीजी ।।
माझीच ट्रंक म्हणतो(/ती) वर भाऊराय (/ ठाकरे) हे।
' दादा, न येईल रडें मग हो कसें हे।।४।।

—--

# 'अयइ, धुंडत बाळ आलं '

हा बाल सूर्य वर रांगत येत आहे ।
पाहुनि सृष्टी-जननीस करेंच बाहे ।।
उत्फुल्ल नेत्र कमलें हंसताच सृष्टी ।
झाली प्रभासित सुकोमल-भाव-दृष्टि ।।१।।

गेली लयास रजनी 'पुनराग माय'।
लीला विचित्र इकडे करा सृष्टि माय।।
मांडीवरी जननी घे रवि बाळ तान्हा।
पाजी रसांस फुटला जणुं काय पान्हा।।२।।

होतां प्रभात अशि ही उठली प्रभा ही।
इंदू कडे हंसत किंचित वेळ पाही ।।
थोडी मनीं पुट-पुटे मग कां हि गाई ।
इंदू असे निजलि ही चुपचाप जाई।।३।।

न रडतां कळतां न कुणा पहा ।
हळुच इंदु कशी उठली अहा।।
फिरत रांगत रांगत रांगत ।
विविध वस्तूंशि खेळत थांबत ।।४।।

कोठें मिळे तिज खडा मग रांगतांना।

काडी मिळे निसटतां करि शब्द नाना॥

नांना ततां तत ततां तततां न तांना।

ज्यांच्या पुढें सकल नीरस राग ताना ॥५॥

मी जाउनी जवळ मागितलाच पापा।

ऐकेल काय कधिं बाळ सकाळिं बापा ॥

ती दूर सारूनि मला कर पल्लवांनीं।

रांगे पुढें तशिच ती मज तुच्छ मानी॥६॥

माता तिची धुवत(अ)से मुख अंगणांत।

इंदू असेल उठली म्हणत्ये मनांत ॥

तों पातलीं रडत इंदु विशाल-भाल।

माता म्हणे 'अयइ, धुंडत बाळ आलं'॥७॥

हेलावलें हृदय वत्सलता-रसानें।

प्रेमें करी स्वतनयेस सुतृप्त पानें॥

मांडी वरीं अडवा घे करि प्रेम वृष्टि ।

जेव्हां भिडे परम मोहक बाल-दृष्टि ॥८॥

—----

# ऐकलं का!!

का ऐकलें म्हणत काय प्रभा असे ही।
सोडुनि काम सगळें बघणें कसें ही॥
मी येउनी बघितली मग बाळ-लीला।
वर्णावया कठिण भाव तिचे मतीला॥ १ ॥

काढीत रेटुनि मुखांतुनि शब्द 'काय?'।
गालास ती फुगवुनी  पसरीत पाय।
पाही समोर इकडे तिकडे बघेना॥
तीच्या कडेस बघतां हंसु आवरेना॥ २ ॥

माई तिची हंसतसे हंस तां न राही।
गेलों तिच्या जवळ मी पण ती न पाही॥
तोंडास ती फिरवी मीहि समोर जाई।
तों लागलों उभयतां  हंसुं बाप आई॥ ३ ॥

तोडी हंसें अति सुकोमल बंधनानां।
फोडीतसे हृदयसागर बंध नाना॥
घ्यावी किती तरि बुडी मम कल्पनांनी।
येती प्रभा- हृदय- भाव न अल्पध्यानीं॥ ४ ॥

नेत्रांतुनी प्रगटली यमुना सङ्गगा।
जी पावनी करित निर्मल अंतरङ्ग॥
झाली विशुद्ध जयिं चञ्चल बालवृत्ति।
तेव्हां दिसे स्फुरित बाल वच प्रवृत्ति॥ ५॥

'हें काय गे खदखदा हंसशीस माई !
जा बोलणार तुजशीं अगदींच नाहीं।॥
हें बोलता करित तिर्कस नेत्र होती।
माईस त्या गुदगुल्या मनिं काय होती॥ ६॥

वाटे अहा! मज विलक्षण बाल-लीला।
डोळे वटारित बघे मग माउलीला।
' कां राग हा?' पुसत अंमळ मी लवून।
प्रेमें तिच्या हनुवटीसहि हालवून॥ ७॥

' माझी प्रभा कशि गरीब असे बिचारी।
पाहू नको  हिजकडे' तिज मी विचारी॥
' झालें तुला अग प्रभे, रुसण्यास काय?।
तूं शाहणी मुलगि आवर बाल पाय॥ ८॥

' माई' लबाड', किनई, म्हणते मला हो ।

' मारीन थप्पड' म्हणे मज व्यर्थ का हो! ॥

खेळीत मीच नुसती गहुं तांदळाशी ।

कध्धीं अतां कधिं न बोलिन मी हिच्याशीं ॥ ९ ॥

## ' गोड'

(आनंदाच्या दिपावळी खास अंक १९३२ चा त्यांत प्रसिद्ध झाली)

झाले जरी गोड कधीं दुपारीं ।

खावा विडा बाळ तशी सुपारीं ॥

तूं एरवीं बाळ विडा न खावा ।

बोले' बरें' दावत भाल भावा ॥ १ ॥

झाले पुढें दिवस नंतर पांच सात ।

आली विडा दिवशिं एकच खात खात ॥

'खाल्ला विडा!' सरळ ती चिमणी म्हणाली ।

' कढी खरंच फारच गोड झाली' ॥ २ ॥

—--

# मोहन - शिष्टाई

शिष्टाईला मोहन गेला,
कौरव बसले गोल, सभेला ।
द्वारकेश जो सौराष्ट्राचा (गुजराते चा)।
सत्सुत प्रेमळ भूमातेचा ॥
आवडता अपि गरिब प्रजेचा ।
हृदयान्तरिं जो कळवळला ॥१॥

सभेंत माता दीन जाहली ।
पाहतां पाहतां वसनें हरली ॥
अन्न अन्न तिज दशा पातली ।
धांवुनि तिज जो सहाय झाला ॥ २ ॥

भारत-माता द्रौपदि ज्याला ।
वन-वासिनि दे भाजी पाला ॥
तृप्त कसा परि मोहन झाला।
प्रेम खऱ्याचा खरा भुकेला॥३॥

सत्पक्षाचा जो अभिमानी।
माने रिपुदल तृण सम मानी ॥

पर बल वेष्टित बोले वाणी ।

सज्जन वृंदीं  हर्ष जाहला ।।४।।

अनभिषिक्त तो मोहन- राणा ।

पीडित- पालन ज्याचा बाणा ।।

करूनी निर्भिड सौम्य भाषणा ।

चटका लावी पर ह्रदयाला ।।५।।

'आजवरी तुम्हि वर वर बोलें ।

हवेत तितुके करार केले।।

हवेंत सगळे उडून गेले।

पाळा ह्या तरि वेळेला ।।६।।

स्वार्थ मूल जी लूट मांडली ।

तुम्ही पाहिजे सर्व सांडली ।।

म्हणा  आज ही गांठ बांधली ।

राखूं आपल्या वचनाला।।७।।

बंधू बंधू कौरव पांडव।

व्यर्थ कशाला अकाण्ड ताण्डव।।

वैभव भोगा सर्व हि बांधव।

सोडूनि केवळ स्वार्थाला ।।८।।

सोडावें तुम्हि कुटिल स्वभावा ।

स्वराज्य द्यावें अपल्या भावा ।।

भावा हृदयीं प्रेमळ भावा ।

सोडूनि तामस लीलेला।।९।।

ज्याचा हिस्सा त्याला द्यावा ।

श्रेष्ठ पणा जो मिळतो घ्यावा ।।

श्वेतकुलाला डाग न लावा ।

निकराच्या तरी ऐका बोला ।।१०।।

भटकुनी आम्हीं वना वनांत।

सोसूनि पुष्कळ जना मनांत ।।

घाललि बहु भर तपोबलांत ।।

दिपवूं आम्ही सर्व जगाला ।। ११।।

विसरू जें जें मागें झालें ।

लाक्षागृहिं जें प्रयत्न केले ।।

भोजनिं कीं विष  कालवलेलें ।।

वळाल जरी ह्या वेळेला।।१२।।

तुम्हीं आम्ही भाऊ भाऊ।

अर्धी अर्धी भाकर खाऊ ।।

सुखदुःखाचे सोबती होऊ।

देऊ आपण जीव जिवाला ।।१३।।

स्वतंत्र आपण मिळुनी  राहू ।

ऐक्य रसाची गोडी पाहू।।

प्रेम पयोनिधी मध्यें पोहू।

उमजा या हित वचनाला ।।१४।।

पुष्कळ तुमचें राज्य चाललें ।

समजा आतां राज्य चाललें ।

पाण्डव आतां फार तापले।

बोलावा नच नाशाला ।।१५।।

अमुचा निश्चय स्वराज्य मिळवू।

जलनिधी मध्यें असत्य बुडवू।।

सत्याग्रह हा नित्य चालवूं।

कीर्ती घाली माळा ज्याला ॥१६॥

दिसावयाला मोहन सादा।

सांगे करूनि केसरि नादा ॥१७॥

सत्य युक्ति च्या अनुपम वादा।

ऐकून कुरूपति उत्तरला ॥१८॥

'मागणाऱ्यां  नरां भिकाऱ्यां।

मिळें न कांहीं जगांत साऱ्या ॥

तुमच्या मनिंच्या फुकट भराऱ्या।

मानिति ज्यातच अटकेला ॥१९॥

कींव वाटते बघुनी याचन।

मण गट दण गट केल्या वांचुन॥

काय कराया जगिं तुम्हि वाचून।

पुरेंच वच हें शहाण्याला ॥२०॥

सार्वभौम नच देइ  प्रभू मी।

सुइच्या अग्राइतुकी भूमी ॥

त्यांला  सांग ज्यांचे तुम्ही ।

प्रतिनिधी होउनि मोहन आला ।।२१।।

—--

## भावः -तरंङ्गं

गंभीर भाव तळ आकलन प्रसंगीं।
मारा बुडी रसिक हो कवी-अंतरंगीं।।
तेव्हां खरें समरसात्मक चित्त होतें।
वाणीस जे अकथनीय अगम्य होते ।।१||

जेव्हां उठे मनिं तरङ्ग अनेकरङ्गी।
उल्हास खेळत असे कवी अंतरङ्गीं।।
ज्याची खरोखर नसेच बरोबरी ही ।
सांगू किती अकथनीय परोपरी ही ।।२||

पाही जिला स्थिर चरा न च जीवसृष्टी।
संपातिशी करुनि परमसूक्ष्म निगूढ- दृष्टी।।
किंवा मनोगति मरुत्सुतशी करावी ।
अत्यन्त सूक्ष्म नयनें कविता बघावी।।३||

ही कल्पनामय विदेह सुता कृतीची।
ती गूढ बंधनिं नसे रुचिरा कृती ची।।
चित्तें बघा सुकवितामय बाहुलीला ।
जाणीत रामहृदय स्थित भावलीला।।४||

—---:

# एका अधःपतित मित्रास

केल्या तु वां जरि अनन्त हि पापराशी ।
लावीन मी तरि तुला अपुल्या उराशीं ॥
ठेवीन त्वद्च्हृदय मी अपलें च पाशी ।
बांधून तें प्रणय तन्तु विशाल पाशीं ॥ १ ॥

आहोंत केवळ संख्या शरीरें निराळें ।
हे जीवनौघ अपले अगदीं मिळाले ॥
सोडो तुला जग सख्या पण मी न सोडीं ।
मित्रा परन्तु नव बंधन निंद्य तोडी ॥ २ ॥

पुष्पांत गंध विलसे सुकुमारता ही ।
येती अहा ! रसविलोभित भृंग पाही ॥
मित्रा करी सुमन तूं अपलें सुगंधी ।
भृंगां नरां धरिल सद्गुण भाव बंधी ॥ ३ ॥

भूलोकिं मानव तसे सुर स्वर्गलोकीं ।
निर्दोष कोण असती सखया , विलोकीं ॥
झांकी विभूति अनलास कधीं कधीं ती ।
ती झाडतां प्रगटते नव दिव्यदीप्ती ॥४ ॥

माझे तुझ्या हृदयिं वाक्शर तीव्र लागो।

सद्वृत्ति मानसिं तुझ्या रमणीय जागो ॥

होवो विषादघन पुञ्जित हृन्नभांत।

विद्युल्लता कडकडाट तसा मनांत ॥ ५ ॥

होवो पुढें परम मङ्गल अश्रुवृष्टि।

होवो विकिल्मिष तुझी निवळून दृष्टि ॥

आंखून बंधन (तुझे मन) दशेंद्रिय त्यांत वागो।

पुष्पें तुझ्या शिरिं संख्या पडण्यास लागो ॥ ६ ॥

—--

# लपंडाव

मी म्हटलं की कोणी आलें ।
खास बघुनि मज हंसलें ॥ध्रु०॥

इकडे बघितले , तिकडे बघितले ।
चिट पांखरु ही नसे फडकले ॥
हृदयगृहान्तरिं सर्व हुडकलें ।
भासच नुसता कशि मी फसलें ॥ १ ॥

वाटे कोणी प्रथम थबकलें ।
डोकावुनि कीं हळूच हंसलें ॥
मुळीं न कोणी पण सांपडलें ।
भासच नुसता अगदीं फंसलें ॥ २ ॥

कोणी पाहिल म्हणुनि वचकले ।
सहजच मी तरि काय दचकले! ॥
अशी कशी मी बाई चकले! ।
भासच नुसता कशि मी फंसले ॥ ३ ॥

खालींवर मी कितिदां गेले ।
जीव खालिंवर होतां म्हटलें ।

वाट बघूं किति एं मेलें ।
काय बाई मी किति तरि फसले ॥ ४ ॥

परत वाटलें कोणी हंसलें ।
परतुनि मग मी चटकन् उठलें॥
थोडि बिचकले मटकन् बसले।
भासच नुसता परतच फसले॥५॥

मला न कोणी कोठें दिसले ।
दाराआड पण कोणच दडले॥
हंसत हंसत मग अडुनि बाघितलें ।
अग बाई कळलें पुरतें छळलें॥६॥

कसें कसें मज चुकलें चुकलें।
वाटे, कोठें कीं मी चुकलें ॥
अंत पाहणें कधिं तरि चुकले॥
रडवी जें तें हसणें कसलें॥७॥

पुरें पुरें हें फंसवे हंसणें ।
म्हणाल आता ' कशास रुसणें॥
व्यर्थच सगळे फुगणें बिगणें ।
कळवळलें मन 'सगळे' कळले॥८॥

टिके न हंसण्या समोर रुसणें।
कसलें रूसणें फसणें बिसणें॥
प्रेमें भरलीं दोन्हीं सुमनें ।
वीज चमकली डोळे फुलले॥९॥

Note: Transcript of fan-.mail received as response
Letter

||श्री||

दरभंगा
ता o २८ . ६. ४०

सप्रेम नमस्कार विनंती विशेष माझा परिचय नसतांना हे पत्र लिहीत आहे त्या बद्दल माफी असावी. काहीं दिवासा पूर्वी आपली "लपंडाव" नावाची कविता माझ्या पहाण्यात आली. मी कवि नाहीं किंवा लेखक सुद्धा नाहीं. कविता कळण्याजोग्या असल्या कीं त्या जरूर (कळतात….) समजतात. आपल्या "लपंडाव" ने मनाचा तो भाग नेमका हुडकून काढला व खरोखरीच हककत (हकीकत) घडत आहे असे चित्र उभे केले. हे चित्र बहुतेक घरात पहाण्यास सांपडेल असे मला वाटते. पण आपण इतक्या सुन्दरते ने शब्द रचना केली आहे की तीं सहज सुलभ वाटते. आपले अभिनंदन केल्या शिवाय राहवेना म्हणून दोन ओळीं लिहील्या. त्याय प्रमाणें आपल्या कडोन आणखीन् कवितांची मागणी करण्याचा बेत आहे. तेव्हां आपण कृपा करून काहीं कविता पाठवा ल आशी आशा करीत आहे. आपणांस त्रास होईल ,कदाचित  वेळही नसेल हे उमजत असून सुद्धा कवितांची मागणी करीत आहे त्याबद्दल क्षमा करावी. कळावे लोभ असावा हे वि.

आपला
श्री. वि. वाडदेकर

पत्ता:

S V Wadthekar
LEE, A. Am IEE ; MISE
Chief Engineer
Power House
Darbhanga

—---

## 'छोनुकलीला छोलुन गेले ! '

।।अयइ ।।छोनुकलीला छोलुन  गेले ।

लगबग लगबग ही बघ आले ॥ ध्रु० ॥

माझ्या मांडीवरते असतां ।

प्रेमरसाचे घुटके घेतां ॥

मिटले डोळे बघतां बघतां ।

क्षणकीं नुकते थोडे गेले ॥ १ ॥

चळवळ वळवळ अगदिं न दिसतां ।

परत परतुनी वळुनि पाहतां ॥

वाटे मजला निजली आतां ।

क्षण कीं नुकते थोडे गेले ॥ २ ॥

थोडे क्षण लगेच जातां ।

ऐकूं आले हुंदके घेतां ॥

म्हटलें ' आयइ , उठलि ' ऐकतां ।

कान ध्यान गे इकडे लागले ॥ ३ ॥

उगी बाळ  हें  काम करूनी ।

हातांतले कीं काम टाकुनी ॥

घेते लवकर लवकर येउनी ।
                    काम कशाचें बाळच उठलें ॥ ४ ॥

उजव्या हाताखालिं टेकुनी ।
डाव्या हातें मूठ वळुनी ॥
करवी तितकी लांब करूनी ।
                    थांबत रांगत बाळ सरकलें ॥ ५ ॥

एक सारखी टक लावूनी ।
एं एं में में शब्द करूनी ॥
झटके देई मान हलवुनी ।
                    मातेला शिशु हृद्गत कळलें॥ ६ ॥

पुन्हां पुन्हां ती मूठ उघडुनी ।
बोटें लवकर लवकर हलवुनी ॥
बोलावित ती उंच उचकुनी ।
                    मुक्या जिवाचे भावच कळले ॥ ७ ॥

हृदय' आइचें गद्गद झालें ।
कधीं मनांतुन बाळ न ढळलें ॥

म्हणुनि मना शिशु हृद्गत कळलें ॥
मृदुलभाव मनिं समुदित झाले॥ ८ ॥

हृदय दृष्टीचें जाळें पडले ।
सूक्ष्मतंतुनें बालक बंधलें ॥
दुरुन  दृष्टिंत ते गुरफटलें ।
हृदय तरङ्गित नाचुं लागलें ॥ ९ ॥

नळहि जयाचे हृदयिं लागलें ।
घळ घळ घळ ते अश्रु चालले ॥
हृदया कडेस  वळले रुळले ।
हृदय सागरीं जातां सकलें ॥ १० ॥

टप टप टप टप खालीं पडले ।
प्रेमाश्रू जणुं फुकटच गेले ॥
बघुनि जननिचें मन कळवळले 1
शिशु शिरिं मौक्तिक मग वर्षविलें ॥ ११ ॥

चुंबुनि बाळ उचलीवरती |
घेई बाळा मांडीवर ती ॥
अश्रु बिंन्दुने न्हाणी मग ती ।

हर्ष भाव मनीं उदेले (उद्वेले) ॥ १२ ॥

हळूच कोणी तिकडुन आले ।

ज्यांनीं कौतुक सर्व पाहिले ॥

बघ तां दोघे, डोळे भरले ।

हर्षरूप मुखिं स्मित मग फुलले ॥ १३ ॥

—---------

# बालिके ची मध्यस्थी

उभय दृग्विषयी कृत बालिका। (निजलि एक मधोमध बालिका)

नयनिंची सुमनोहर तारका॥

चिमुकली चिमणी चि उं च्यूं करी॥

किरण प्रेमळ ते पडती वरी॥१॥

करि परस्पर लोचन मीलन।

हृदय-भावन सुन्दर कीलन॥

नवलता मनिं कोमलता फुले।

उधळतां वरती नयनें फुलें॥ २॥

शिथिल किञ्चित बाहुंसि गुंफुनी।

जखडती हृदयें तिज बंधनीं॥

निजुनि ती अति कोमल मण्डपीं।

हृदय भाव रसांस अखण्ड पी॥ ३॥

नयनिंच्या शिशु झांकत पाकळ्या।

उमलल्या हृदयांत नव्या कळ्या॥

रस विवर्तिते वत्सल एकला।

प्रगटवी अति रम्य दुजी कळा॥ ४॥

शृंगार भाव (स्फुरले) प्रगटे उभयान्तारङ्गीं ।

रङ्गे तरङ्ग अति तुङ्ग अनङ्ग रङ्गीं ॥

उत्कण्ठता तरल तारक नेत्र झाले ।

कण्ठांत चारुभुज मण्डल हार आले ॥ ५ ॥

वक्ष:स्थळीं घन तडित् स्फुरली , निघाळें।

मध्यस्थ बाळ, हृदय -द्वय एक झालें ॥

होतां रसैक्य हृदयीं मृदु - जल्पनांनी ।

ध्यावा विराम कवि - राम - सुकल्पनांनीं ॥ ६ ॥

_—------

## आरशांतले माकड

बाळे, दिसेल तुज गंमत आरशांत ।

पाहीं, दिसेल तुज माकड एक आंत ॥

आहे खरें, पण मला दिसतात दोन ।

मी एक आणि दुसरें मज सांग कोण ॥

—-----

# नन्दन वनांतील कळ्या

मजसि आवडते कमळी किशी।

चिमुकली पण इंदु कशी तशी॥

' आणखि कोण' ? प्रभा पुसते पुढें।

जननि च्या मग येत पुढें पुढें॥ १॥

माता तिची तिजकडे कसली पहाते।

तोंडासि ती हलवि कोमल बाल हातें॥

' तूं सांग कोण अणखी तुज आवडतें '।

माई न उत्तर तिला अगदींच देतें॥ २॥

माई मुखास फिरवी दुसऱ्या दिशेला।

तोंडावरील हंसु ते न दिसे प्रभेला॥

लागे प्रभा मन तिचें वळवावयाला।

औत्सुक्यभाव अपला कळवावयाला॥ ३॥

रागास सौम्य करितें स्मित झांकलेलें।

झालें सुहास्य किरणें मुख फांकलेले॥

अत्यन्त लीन मग राग प्रभाला होई।

येतां प्रभा अरुण - राग लयास जाई ॥ ४ ॥

कीं राग तो धरितसे अनुराग - कान्ति ।

संपून तामस कथा विहरे प्रशान्ति ॥

उत्फुल्ल बाल लतिका मग ग्लान थोडी ।

झाली, बघून जननी मग राग सोडी ॥ ५ ॥

सोडी म्हणा उगिच तो सुटला कधींचा ।

राहीच सौरभ जिथें फुलला बगीचा ॥

जेथे कळया हंसति मङ्गल हास्य रूप ।

आनन्द - गन्ध विहरेच  तिथें अमूप ॥ ६ ॥

बोले प्रभा' अणिक कोण?' म्हणेच आई 1

' माझी प्रभा' मग नितान्त प्रफुल्ल होई ॥

झाली सुरु त्वरित चुम्बन प्रेम वर्षा ।

ना यार त्या अतुलनीय अमूल्य हर्षा ॥ ७ ॥

जेह्वां मुली बिलगल्या निज माउलीला ।

ती प्रेक्षणीय दिसली शिशुभावलीला ॥

वेलीस बालकलिका जणुं लागलेल्या ।

आनन्द- नन्दन वनान्तरिं की उदेल्या (उद्वेलित झाल्या) ॥ ८ ॥

नेंत्रांत हर्ष किरणें फुललीं अनेक 1

उत्फुल्ल पाहति परस्पर एकमेक ॥

माझी मुकी बघत इंदु लहान तीही |

हें पाहतां थकुनि थांबत लेखनीही ॥ ९ ॥

—----

# पाटी

' पाटी मजसि आणून द्या सकाळीं ।

वेल्हाळुनी म्हणत ती मज एक वेळीं '॥

'कां फोडलीस पहिली'? पहिलेंच बोल' ।

ऐका पुढील हृदयांतिल शुद्ध बोल ॥ १ ॥

' मी फोडिली न', म्हणते अगदी खरें हें ।

वाटेल त्यास हि खुशाल पुसा बरें हें ॥

हातांतुनी सहजती फुटली पडून ।

आणून द्या नवि उद्या म्हणते म्हणून ॥ २ ॥

—----

## अभिनव - गगन

विरल पुञ्जित शी जणुं भासली।

सघन केश कलाप घनावली ॥

नयनिं वीज बसे स्फुरणान्तरीं।

स्फुरति पार्वण चन्द्र रवी उरीं ॥ १ ॥

कुडि मधें मुनि सप्त कलाप हा।

जघन जह्नु सुता प्रसृता पहा ॥

चमकते चमकी कधिं चांदणी।

नथहि पुञ्जित - तारक साजणी ॥ २ ॥

उडुगणें लपती वदनान्तरीं।

जणुं नभीं भिउनी शशिला तरी ॥

कधिं कपोल उषा तव रंगवी।

अरुण सुंदरता मन गुंगवी ॥ ३ ॥

श्रमजलकणिका ह्या भाल देशीं उदेल्या (उद्वेलित झाल्या)।

अभिनव नव तारा प्राङ्गणीं खेळलेल्या ॥

लपति उदित होती कुंकुमा भोंवतालीं ॥

बघत नवल माझी दृष्टि ती दंग झाली ॥ ४ ॥

निज तनु विभवानें शारदीयाम्बराला।

हंसशि गमत शुभ्रा नेसुनी अंबराला ॥

म्हणुनि किति जरि ही फार मी दूर राही।

हृदय नभिं तुझें हे रूप मी रम्य पाही ॥५ ॥

गगनशी अशि तूं गमते अहा।

विहगशी मन घेत उडी पहा ॥

उडत मानस वायु विमान (अ)सें।

फिरत स्वैर विहार करीतसें ॥ ६ ॥

आकाश एक हृदयांत मठीं घटीं वा 1

तैसे विशुद्ध प्रणयैक्य विभिन्न जीवां ॥

आहेस तूं गगन रूप सुदिव्य कान्ति।

हृन्मण्डलीं वसुनि व्यापुनि दे शि शांति ॥ ७ ॥

आकाश - तारकित पिण्डित मेध पुंज।

तुझी तनू प्रतनुशी पण सांठवीते ॥

तेज स्वि गोल शशि सूर्य तडित्तशीते ॥ ८ ॥

साक्षात खरी असशि मूर्तिमयीच सृष्टि 1

माया विशाल जणुं व्यष्टिगता समष्टि ॥

गर्भांत सांठविसि तेज विभिन्न रूप ।

होंशी अनेक मज मान निमित्त रूप ॥ ९ ॥

- —----

## प्रास्ताविक (१)

कविता लिहिली कशी तरी ।

रचली ही सुचली जशी मला ॥

नमुळीं रुचलि जरी कुणा ।

म्हणतो ही म्हणतां नये (जरी) तरी ॥ १ ॥

रस- भाव -अभाव ही असे ।

पदलालित्य न अर्थ - गौरव ॥

मधुरत्व गुणीं तशी उणी ।

करितों श्रेष्ठ पदांस अर्पण ॥ २ ॥

अपल्या हृदयांगणांत ही ।

बहु खेळो जणुं खेळ बाहुली ॥

जरि नाचवि कल्पना हिला ।

वसनें नेसवुनीच फाटकीं ॥ ३ ॥

हिज आपण आपली म्हणा ।

म्हणजे मी सगळेंच पावलें ॥

नवमेघ दयार्द्र होतसे |

जरि कीं चातक याचना करी ॥ ४ ॥

अपले कधिं लेकरूं कसे ।

जरि बोले बहु बोल बोबडे ॥

नुमजे वचतें ; रुचे तरी ।

नच दे क्लेश हि अर्थलेशता ॥ ५ ॥

समयोचित ताल देउनी ।

अतिप्रोत्साहित लेंकरा करा ॥

तुम्हि स्वस्थ बसाल हो जरी ।

तरि बेताल नितान्त गाइल ॥ ६ ॥

मधुनी मधुनी म्हणून द्या |

तुम्हिं टाळया, चुकुं कीं रुकूं नका ॥

कधि मानहि हालवीत जा ।

म्हणजे होइल खूष बालिका ॥ ७ ॥

—----

# प्रास्ताविक (२)

फुलली जरि सर्व बाग ही

असुद्या बाजुस रानटीं फुलें ॥

मिळुनी गजऱ्यांत सर्व तीं ।

खुलवीती किति केश - कांतिका ॥ १ ॥

स्वशिरीं नवपत्र खोंविति ।

युवती केरळ देश कोकिला ।

मग हीं तर गोजिरीं फुलें

शिरिं कोणी तरितीं धरील का ? ॥ २ ॥

शिथिला रचना किती असो ।

कितिही अर्थ असोच फोलकीं ॥

मिळवीत खडा अनर्घता ।

जडतां दिव्य परन्तु कोंदणीं ॥ ३ ॥

जडतां कविता भवन्मनीं ।

मिळवूनी मग स्थान गौरव ॥

विशदार्थ विकासनें पहा ।

मिळवो अर्थ स्वजन्म सार्थक ॥ ४ ॥

—--

# अनुनय

' गालावर ची वरती लाली, ।

चढुनी, डोळ्यावर ती चढली ॥

सूज तशी ही नेत्रीं आली ।

गांधिलमाशी काय चावली?

माम अशी कां थोडी कलली ।

वाटे मजला कीं अवटळली ॥

काय दिसे तुज टकच लागली ।

बघशिन मज जणुं वळख विसरली ॥

नेहमीं तूं तर हृदयीं झुलली ।

काय जाहलें ? का रागवली?'

ऐकुनि मग ती किञ्चित हंसली ।

करतलधृत निज मुख छबि खुलली ॥

पानावर सुम कान्ति पसरली।

डोळ्यांतुन मग लालि उतरली ॥

परतुनि गालावरी विकसली ।

तेढ मनांतील मनांत विरली ॥

हळूच बुबुळें तिरपीं फिरलीं ।

हळूच हृदयांतील कळि उलली ॥

हळूच वाचा मग की हळू हळू फुटली ।

' चला, गोष्ट मज सगळी कळली ॥ '

—---

## ती - तो

' मज आवडते खरोखरी ।

लुगडें इर्कल कीं महेश्वरी' ॥

' जरितें नसलें बरें तरी ।

असशी आवडशी तशी परी' ॥ १ ॥

' चमकी रुचते मला अती ।

नथ कीं आवडतें मुळीं न तीं ॥

' खुलवीत मुखा तुझ्या कुडया '

मन मारीत चकोरशा उडया ॥ २ ॥

' खडि ज्यावर काढिली गडे ! ।

मजती कञ्चुकी फार आवडे ॥

'मज आवड आवडे तुझी ' ।
रुचि अन्योन्य मनीं नसे दुजी' ॥ ३ ॥

' रुचिर मोहन माळ गळयांत ती ।

खुलत नाहिं बरें सगळयांत ती !' ॥

' मजहि नावडते अगदीं सरी ।

अतिगबाळ स्त्रियांस रुचे परी '॥ ४ ॥

' मज नको पदबन्धन सांखळया ।

ठस ठसा मजलागति तोरड्या ॥'

मृदुपदा  कमला सम कोमला ।

' अनुचिता असती गजशृंखला ॥ ५ ॥

' डोक्यांत फक्त गजरा हंसऱ्या फुलांचा ।

वाटे बराबर गुलाब सुरम्य साचा' ॥

' गोंडे फुलें न युवती शिरिं घालता ती ।

आतां न घालिति कुणी जुनि रांकडी ती ॥ ६ ॥

तंतोतंत तसें कसें जुळतसे' माझें तुझें हें असें ।
माझ्या मानसिं सूक्ष्मभाव तव ते कीं बिंबिले हे कसे ॥
माझ्या ज्या मनिच्या तुझ्याच हृदयीं सद्भावना राहती ।
सीमा कीं उपमा तशी जगिं न ह्या आत्यंतिकैक्यास ती ॥ ७ ॥

—---

# पञ्चकन्या

सुकुमार कुमारिका मम l .
मुलि चारी हुन अन्य पांचवी ॥
मज सर्व जशा तशीच ही ।
कविता नामक गोड आत्मजा ॥ १ ॥

म्हणती जन ' बाळ इंदिरा' ।
तशि ती बाळ प्रभा हि गोड ह्या' ।
कमळी हि मला तशी दिसे ।
किशि कृष्णा पण आवडे कशी ॥ २ ॥

चिमण्यांत किशीच कोकिला ।
कलकण्ठें सगळयांत सुंदर ॥
नयना उडवून बोलतां ।
चमके तेज अपूर्व त्यांतलें ॥ ३ ॥

अधरान्तरिं दन्त पङ्क्ति त्या ।
स्फुरती सुन्दर बाल - तारका ॥
गगनीं किति त्या चककिती ! ।

जणुं कृष्णा निशिंतील चांदण्या ॥ ४ ॥

सगळयांत खट्याळ पांचवी ।
हृदयाला पण काय मोहवी ॥
नटते मुरडे कशी तरी ।
किति आंगावर साज घालते ॥ ५ ॥

अति सुन्दर मञ्जु भाषिणी ।
वच बोले पण सारगर्भित ॥
अति अल्लडशी दिसे जरी ।
बहु दावी मृदु हाव भाव ती ॥ ६ ॥

कधिं नाचत वल्लरी सह ।
लहरींच्या लहरी बरोबर ॥
कधि चांदणिशी नभोङ्गणीं ।
कधिं खेळे कुसुमां कळयांसह ॥ ७ ॥

कधिं कर्कश कंठ काक सा ।
कधिं ती कोकिल गान मञ्जुता ॥
रडुनी हंसवी कधीं कधीं ।
हंसुनी ती रडवी कधीं तशी ॥ ८ ॥

नीलांबरीं चमकते खडि चांदण्यांची।
तें नेसुनी, प्रकृति - भूषण - भूषिताङ्गी॥
शृङ्गार आदि रस सिञ्चित भू करूनी।
क्रीडाङ्गणीं सहृदयान्तरिं बाळ नाचे॥ ९ ॥

अति कोमल भाव मूर्ति ह्या।
नचठेवीन अशा तशा पुढें॥
रसिकास करीन अर्पण।
हृदयाची महिमा जया कळे॥ १० ॥

लज्जावन्ती दला ला अतिमृदुलकर स्पर्श ही दे विषादा।
बाळावेलीस किंवा प्रखरतरकर स्पर्श कोमेजवीतो॥
वृत्ती बालातपाची मृदुकर शशि ची बिंबवा कीं मनांत।
अत्यन्ता सौम्य दृष्टी करूनि तुम्हि बघा बालिका भावलीला॥ ११ ॥

निन्दावन्दा तुम्हींच वा क्षिति मज अगदीं नाहिं ती वाचकांनों।
पाही ह्यांच्या विहारा मम मनिं स्फुरती भावना काय काय॥
माझ्या ह्या पञ्च - कन्या गढुळ हृदयिंच्या किल्मिषां नाशतील।
भावानें ऐकणाऱ्यां श्रुतिफल मिळतें सत्य ही राम - वाणी॥ १२ ॥

—----

## गूढ

कांहींही न इथें म्हणून म्हणती कांही तिथें ही दिसे ।
जेथें कांहिं असे, असेंच म्हणती, तेथें न कांही असे ॥
आहे जें अगदीं उगीच म्हणती तेथें हि हेतू दिसे ।
जेथें हेतु दिसे , असे उगिचतें , निर्हेतुता कीं वसे ॥ १ ॥
जाज्वल्यानल-गोलदीप्ति उदरीं विश्वात्मता राहते ।
खेळे वाडव - अग्नि सागर जलीं लाटा सवें खेळते ॥
वाटे कोमल फूल हें पण वसे तेथेंहि आशीविष ।
पीयूषान्तरिं ही लपे विषमिषे जाज्वल्यतें किल्मिष ॥ २ ॥
जेथें कीं फुललें हंसें तरि तिथें, राही रडें अन्तरीं ।
कोठें खिन्नमनस्कता वसतसे , उत्फुल्लतेच्या वरी ॥
नेत्रांच्या मधुनी फुलें हि ठिणग्या एकाच वेळीं पहा |
वज्राघात मनीं पुन्हां गुदगुल्या दोघांस ही वास हा ॥ २ ॥
चौदाही भुवनें फिरून सगळी ही गुंगली मन्मती ।
ह्यांचे कारण कार्य भाव बघतां; तुम्ही पहा सत्मती ॥
आहे हें नच हें न तें न अणखी ; भ्रान्ती म्हणावी जरी ।
जें प्रत्यक्ष असे परन्तु न कळे, तें गूढ आहे तरी ॥ ४ ॥

—--

# स्वगृहीं मृत - वीर आणला

स्वगृहीं  मृत-वीर आणला ।
 नच मूर्च्छा न रडें तिला हिये ।।
बघुनी म्हणती सख्या तिच्या।
 जगवाया रडवा हिला तरी।।१।।

स्तवती  मृदु मञ्जू तद्गुणा ।
'कितीग प्रेमळ लाडका असे! ।।
सुसुहृत्तम  वीर श्रेष्ठ तो।
 द्रववी हें नच बोलवी तिला ।।२।।

उठली हळु एक बालिका।
 मग वीरा जवळ हळूच ये।।
वदनावरणास काढिते ।
 तरि  बोले न रडें मुळींहि ती ।।३।।

चतुरा अतिवृद्ध धाय ती।
 मग मांडीवरी ठेवी बालका ।।
झाडे नेत्रिं सुरू तुफानिं ची ।
चिमण्या रे , जगते त्वदर्थ मी।।४।।

—-----

(Comments : ह्या विषयाची  एक  कविता Page No 17 वर पहावी )

# मंगलाष्टकें

चंद्राला जशि चंद्रिका प्रियवधू कीं चांदणी साजणी।
पाहूनी निशिकान्त ही कुमुदिनी कान्ता प्रफुल्ला मनीं॥
किंवा हा ऋतुराज ही प्रकृति च्या प्रेमीं दिसे रंगला।
एवं नव्य वधूवर प्रणय हा कार्या करो मंगला॥ १ ॥

वृन्दा चारू सुहास्य श्याम - लतिका श्यामा वरी माउली।
ती सारून तदन्तरस्थ पटला सारूप्यता पावली।
एवं तो अनुराग सत्वर तिचा श्रीरंगिं कां रंगला॥
माया ब्रम्ह वधूवर प्रणय हा कार्या करो मंगला॥ २ ॥

वेदें जो स्तविला स्वयंभु भगवान् शास्त्रें तसा वर्णिला।
ज्यानें हा त्रिगुणात्मक रज्जुग्रथनीं संसार आकर्षिला॥
तो विष्णू तुलसी वधू सह रमो रंगीं जिच्या रंगला॥
माया ब्रम्ह वधूवर प्रणय हा कार्या करो मंगला॥ ३ ॥

अप्रौढा तशि ही लहान वधु हो ध्यावें हिच्या ह्या करा।
हट्टी ही अजुनी निभावुनि हिला सांभाळ हिचा करा॥
लक्ष्मी ही घरची अतांच समजा सौख्यप्रदा मङ्गला।
प्रेमाच्या नवमण्डपात तुम्हिं हो कार्या करो मङ्गला॥ ४॥

बाळे, तूं बघ, सासरीं दुखवुं हो कोणा नको बाइ गे।
सर्वांची बघुनी स्वभाव कल ही तूं वाग तैशीच गे॥
वाटूं दे सगळ्यास तूं जणुं खरी लक्ष्मी जगमङ्गला।
प्रेमाच्या नवमंडपीं विविध तूं कार्यां करी मङ्गला॥ ५॥

रामाला जशि जानकी वरवधू रामास कीं रेवती।

श्रीकृष्ण जशि रुक्मिणी प्रियवधू डी शंकरापार्वती॥

मेघावीज समुद यास सरिता सौख्य प्रदा मङ्गला।

दांपत्य प्रणयांत विश्व सगळें कार्या करो मङ्गला॥ ६॥

कोणाहि अपशब्द तूं कधि नको बोलूं मुली बाइगे।

वाढे ऐक्य घरांत वाग अश तूं ऐक्यीं स्वरी  मौजगे॥

कन्ये भावदुजा सदा समजतूं ऐक्यापुढें भङ्गला।

प्रेमाच्या नवमंडपीं विविध तूं कार्यां करी मङ्गला॥ ७॥

वायू हाल हरी लते सह तसा कीं नाद वीणे सवें।

वाणी सत्कविता रसध्वनि सवें शोभा सुपुष्यासवें ।
आनंदे रसिकात्मतेसह पहा हा भृंग ही रंगला ॥
प्रेमोद्यान - निसर्ग - भावन - विधी कार्यां करो मङ्गला ॥ ८ ॥

बोलावें बहुगोड हट्ट करणें तूं सोड आतां बरें।
वागावें बघ सारखें, वद खरें, सर्वांस वाटे बरें ॥
वाटे साखर पेरिली हृदयिंकी जो ऐकि तो रङ्गला ।
प्रेमाच्या नवमंडपांतरिं करी कार्यां मुली मङ्गला ॥ ९ ॥

हें अन्तः पटरूप व स्त्र तुमच्या दोघांमधें हो असे ।
जातां हेच उपाधिरूप निघुनी होव्हाल कीं एक सें ॥
अन्योन्य प्रतिबिंब हृत्पटलिं की स्वान्तःपराच्या वरी ।
काढा; व्हाल सुखी कृपा करिल तो श्रीराम दोघांवरी ॥ १० ॥

(पाठवणी)
बाळे आज मनांत खिन्न असशी, माहेर वाटे सुटे ।
आई बाप बहीण भाऊ सगळें नातें जणूं हें तुटे ॥
जेव्हां नूतन जीवनात रमशी आनन्द वाटो तुला ॥
तेव्हां तू विसरी अम्हां, अस सुखी ! कार्या करीं मङ्गला ॥ ११ ॥

झाला आज नवीन जीवन कला - आरंभ की येथुनी ।
ठेवा दोन मनें प्रभो! जुळवुनी सूगांत ती गुंफुनी ॥
ऐको कान खास एक , नयनीं दृश्यैकता ती असो ।
कार्ये एकवटोत, हेतु सगळे ऐक्यांत यांचे वसो ॥

घालूनी मृगचर्म युक्त विमला यज्ञोपवीतास हा ।
हातीं दण्ड कमण्डलू चिमुकला कौपीनधारी पहा ॥
मुंजेची किति शोभते करि तटीं कीं काञ्चनीं मेखला ॥
शीमन्मङ्गलमूर्ति बाल बटु हा कार्या करो मङ्गला ॥ १२ ॥

वाढो वृक्षविशाल श्रीगणपति गोविन्द मूलाश्रयें ।
शाखापुष्पफळें दलें अभिनवें संपन्न हो वैभवें ॥
होवो संकुल बालवृन्द विह गें माङ्गल्यना दें डुलो 1
होवो मङ्गल नित्य मङ्गलदिनीं श्रीरामही आठवो ॥ १३ ॥

येथें शंकरपार्वती गणपति श्री शारदेच्या सर वें ।
भामाकृष्ण तशीं अनेकयुग लें सन्मान्य अन्यान्य हे ।
काशी मूर्त अवंतिकापुरि तशी ही अन्नपूर्णा स्वतां ।
प्रेराया शुभमङ्गलाञ्जलिं उभ्या साऱ्या जगन्मङ्गला ॥ १४ ॥

उद्यानांत वसंत - गंध पसरो संसार सारा हंसो ।
मांगल्यप्रद तीं प्रकाश - किरणें चिंतामणीची असो ॥
दिग्देवी शुभवर्षवो शिरिं सदा प्रेमाक्षता सतत ह्या निर्मला ।
संसारी नवकीर्ति गंध पसरो कार्या करी मङ्गला ॥

देवा देई दया मुकुंद तनया या बाला  वाघा सदा
शौर्य केसरिसा असो, मनिं धरो चिंतामणीच्या पदा
संसारात वसंत बाळ सार्थ पसरो गंधा जगन्निर्मला
दुःखी भारत माय पायिं रत हो कार्या करो मङ्गला

**(17.02.1934: श्री कमलाराजाच्या लग्नासंबंधात (महा.से.) महाराज साहेबांच्या म्हणण्यावरून २३.० २.१९३४)**

लक्ष्मी श्री कमला नृपेन्द्र तनया शोभे वधू मङ्गला
तैसा अक्कलकोटनाथ विजयी हा नोवरा शोभला
होवो सौख्यद हा विवाह विजय - श्रीचा जगन्मंगल
होवो सर्व दिशा यशें धवलिता भूचे भरो मंडल
साक्षात् श्रीपरि इंदिरा विलसली चौरंगिं पद्मासनीं ।
शोभा पाहुनि श्रीपति स्मित करी उत्फुल्ल झाला मनीं ॥
आनंदें हंसली वधू विधु - मुखी श्रीरंग आनंदला । आनंदांत वधूवर प्रणय हा कार्या करो मङ्गला ॥ १ ॥
नाना सुन्दर पुष्प कलिका कुंजी लता मंडपीं । सर्वांची पण दृष्टि तेथें खिळली जेथें वरी मंडपीं ॥
शोभा आणि सुवास एक तरुच्या शाखेवरी शोभला । देईं दीर्घ विकासता प्रकृति तूं देवी  ,जगन्मंगले ॥ २ ॥
दोनाचे कर चार आज दिसती झाले अहा ! एकदां । झालीं चार करांत दोन हृदयें एकत्र हृत्संपदा ॥
आनंदें द्विजवृन्द उद्धृतकरें माता पिता सज्जन । गाती मंगलमय गीत करिती मांगल्य सच्चिन्तन ॥ ३ ॥
हातातून वधूवरावरी कुणी मुक्ताक्षता वर्षली । डोळ्यांतून कुणीकुणी वरिवरी प्रेमामृता  सिंचली ।
चित्तांतून सहस्त्र पद्म फुलुनी शब्दांत सांठे मधू । आशीर्वाद मुखें मुखीं झर झरे' ठेवो सुखीं त्यां प्रभू ! ॥ ४ ॥

**(श्री(मती) इंदिराराजे पवार २६. ६. १९३४ संस्थान देवास)**

# शिशु -चुंबन

किशिच्या बसुनी कडेवरी ।

करि' ता, ता,' मम इन्दुपातली ॥

हंसतां हंसऱ्या मुखांतल्या ।

दिसल्या कुंद कळया नव्या मला ॥ १ ॥

न सुवास मुळीं कळींत तो ।

मुख पद्मीं पण वास तीस कीं ॥

हसता हसती कळया जणूं ।

हृदयाची शमते विषण्णता ॥ २ ॥

मग लोंबकळे कडेवरी ।

उतराया जमिनी वरी पुढें ॥

मग लागत बाळ रांगण्या ।

हृदयानन्द मदीय वर्धिनी ॥ ३ ॥

फिरतां चहुं बाजुला तिला ।

दिसला एक सुरेख आरसा॥

पसरीत प्रकाश भोंवतीं ।

किरणें फेंकुनि सौम्य आपलीं ॥ ४ ॥

सुकुतूहल दर्पणोदरीं ।
बघते ती प्रतिबिंब बालिका ॥
तिज भिंत कपाट पुस्तकें ।
दिसती सर्व दुरून पाहतां ॥ ५ ॥

बघते वळुनी समोर ही 1
पण बाहेरहि आंत सारखें ॥
मग लागत रांगण्या पुढें ।
दिसले बाळ समोर रांगतां ॥ ६ ॥

झालें सवेग मन सत्वर रांगु लांगे ।
भेटेन वाटत तिला जणुं काय बाळा ॥
रांगे तशी सरसरा चुचकारूं लागे 1
आंतील बिंब शिशुही समभाव दावी ॥ ७ ॥

आंतील फिल्म - गत - निर्वच बाल लीला ।
दावीतसे सकल इंदु करीत जीजी ॥
मागे, मुखें करूनि' पापू, इंदु पापा ।
दोघी मुखां जवळिं आणिति त्याच वेळीं ॥ ८ ॥

जाणूनि कीं मनि परस्पर भावनांना ।
लावूनि दर्पण तला मुख चुंबिती त्या ॥
हें पाहतां नर हि नीरस मुग्ध होई ।
हें मुग्ध बालक चरित्र कुणा न मोही ! ॥ ९ ॥

खेळे सदा शिशु मनोमुकुरांत माझ्या ।
बाहेर ही फिरत से जडभाव रुपें ।
दोघां' अशक्य परमैक्य असे, असें हें ।
येतां मनांत मग खिन्न नितांत झालो ॥ १० ॥

पाहूनि दृश्य हृदयीं मुकुरीं असें हें ।
काढीत राम नव सुन्दर शब्द चित्र 1
भाव - प्रधान शिशु चुंबन रम्य लीला ।
रंगील काय कुणि चित्रकला प्रवीण ? ॥ ११ ॥

—----

# चर्पट- पञ्जरिका

नकोच दुखणें डोकें दुखणें॥ ध्रु० ॥

आमच्या घरचें वर वर पुसणें ॥

अघळ पघळ तें फार बोलणें ।

ठाउक नाही फी - बी देणें ॥

डाक्तर ला कीं घरिं बोलवणें ।

सोडुनि झटपट खटपट करणें ।

कपाळ कटकट कविता करणें ।

चाले उठल्या सुटल्या लिहिणें ॥

मनात नेहमीं तरि गुणगुणणें ।

ठाउक मुळिं नच कधि ही हंसणे ॥

मुळीं कधीं नच जवळीं बसणें ।

सुखा दुखाच्या गोष्टी करणें ॥

सुरु मात्र हें नेहमीं म्हणणें ॥

जवळ बैस ये काव्य ऐकणें ।

ऐक एवढें हे माझे म्हणणें ॥

ऐकच माझें नवीन गाणें ।

ऐकतांच सुरुं डोकें दुखणें ॥ नको ० ॥ १ ॥

(२)

लागे मागे नित्य टोमणे |

एस्पिरीन घे की बाम चोळणें ॥

इस्पिताळीं तूं उद्याच जाणें ।

डाक्तरला तूं जीभ दावणें ।

डोळे ताणुन सांग' पाहणें' ।

हात चांगला त्यास दावणें ॥

हिरड्या बिरड्या सांग' पाहणें' ॥

नको विसरुं तूं दांत दावणें ॥

ध्यान देवुनि सर्व ऐकणें ॥

जोडा घालुन नेहमीं फिरणें ।

संभाळुन तूं जेव जेवणें ॥

पोट स्वच्छ तूं नित्य ठेवणें ।

डोक्याची तूं काळजि घेणें ॥

असे गरज तर कांहिं खर्चणें ॥

वाइट होतिल डोळे बघणें ।

वाइट दुखणें डोके दुखणें ॥ नको ० ॥ २ ॥

(३)

मला नको तें औषध घेणें ।

डाक्तरचें घरिं जाणें येणें ॥

मज जरि औषध आहे देणें ।

सोडा अगदीं कविता करणें ॥

काम धाम ते कुणीं पाहणें ।

गड्या बिड्या वर किती सोडणें ॥

म्हणुनी म्हणतें नाद सोडणें ।

सुचे तुम्हास न खाणें पीणें ॥

कविते वाचुन व्यर्थच जीणें ।

असें उगिच हे असें समजणें ॥

नांवाने कीं हांक मारणें ।

चाले माझ्या; 'काव्य ऐंकणें '॥

किटलीं माझी दोन्हीं श्रवणें ।

पुरें पुरें हीं आपली कवनें ॥

औषध हें हो खरें समजणें ।

नाहीं तर सुरुं डोके दुखणें ॥ ३ ॥

—------

# मातृभक्ति

स्वप्रेमामृत पोषणार्थ शिशुच्या जी अर्पिते माउली ।

पाहूनी शिशुताप ती शिरिं करी प्रेमाचिकी साउली ॥

सोशी कष्ट अनेक त्यास सुखदे प्रेमामृताची खनी ।

किंवा ही घनरूप प्रेमरसता माना तुम्हीं कीं मनी ॥ १ ॥

' आई' हा ध्वनि ऐकतांच जननि प्रेमाब्धि - हेलावला ।

प्रेमाचे हृदयी तरङ्ग उठले आनन्द संचारिला॥

न्हाणी ती नयनाश्रुनें स्वतनया आलिंगुनी बालका ॥

बालांचा शुभचिन्तनार्थ मगती प्रार्थना जगत्पालका ॥ २ ॥

तैशी भूमि निजांतरंग रस जो पाजी मुलांला स्वयें ।

होतां बाळ , ती , पान्हा जणूं काय ये ॥

पाजी पर्वतपंक्ति निर्गत पया, प्रेमें धरा माउली ।

खेळे बाळ सुखें निजकृपेची तो करी सावली ॥ ३ ॥

वृक्षांच्या कर पल्लवें शिशुजनां वारा पहा घालते ।

ती अंकीं श्रमितांस घेउन(नि) सदा तापास कीं वारिते ॥

' घेवो सृष्टि सुरम्यरूप' म्हणतें बालास हर्षवया ।

ऐशी तत्पर जन्मभू शिशुवरी सौख्यास वर्षावया ॥ ४ ॥

ऐशी प्रेमळ जन्मदा असुनि ही जो नीच  कीं घातकी।

नाही जो रत मायदेश चरणीं माना महापातकी ॥

फोडे हंबरडा घनारव मिषें शोकाकुलां गायशी।

पाहोनी तनयांस व्याकुल अहा, वस्तू नसे मायशी ॥ ५ ॥

जाणा सज्जन ते स्वदेशचरणीं प्राणाहुती अर्पिती।

स्वार्थत्याग सदैवपूर्ण करूनी सर्वांस संतर्पिती ॥

भावांच्या सुखदुःखरूप सदृशां भावांसि जे भाविती।

ऐसे धन्य महानुभाव विमला सत्किर्तीला पावती ॥ ६ ॥

शिंदे राजकुळीं हिरा निपजला ग्वाल्हेरचा भूपती।

सेवो मातृपदारविन्द जनता समृद्ध होवो अति ॥

देवा सद्गुणरत्नमण्डित करा ग्वाल्हेरच्या बालकां।

मातृप्रेम मनीं प्रभो उपजवा, त्यांच्या जगत्पालका ॥ ७ ॥

ग्वाल्हेरा भिध केंद्र रूप नगरी सेवोत हीं बालकें।

उद्योगेंच करो अलंकृत तिला व्यापार विद्यादिकें ॥

त्रिज्यारूपकरें पुढें पसर वो आनंद सद्भावना।

पंतोजी वचनें मुलांस उमजो रामा तुला प्रार्थना ॥ ८ ॥

—------

# ईशप्रार्थना

प्रभात समयीं विहंगमगणें उडूं लागतीं।

सहस्रकरदर्शितें विजयपथें नभीं जात तीं॥

प्रकाश किरणाश्रयें उडत उंच स्वर्मण्डलीं।

सकौतुक तयांकडे बघत भूवरी मंडळी॥ १॥

उठो खडबडून हा शिशु समाज सारा तसा।

निजोन्नति पथक्रमीं निरत हो खगांचा जसा॥

समोर अनुकूलयां सतत बालकां प्राप्त हो।

असो न परका कुणी अवनि ही मुलां आप्त हो॥ २॥

महोन्नति पथक्रमीं अति असोत उत्साहित।

दयार्द्र अवलोकनें सतत होत प्रोत्साहित॥

अकुण्ठित गती असो सकल सन्मती बालकें।

उडूगण जसे तशीं स्वजन नेत्र आल्हादकें॥ ३॥

अनेक जरि संकटें भिवविती मुलां बालकां।

करी निरसनार्थ तूं सबल त्यां जगत्पालकां॥

असो प्रिय मुलांस तो सुपथ सज्जनें आंखला।

कधीं न कचरोत ते; न कधिं भीक घालो खलां॥ ४॥

—-++++

# झोपेंत ये जरि रडें करू काय मामी !

मामी तिची म्हणतसे' मज बाळ, सांग 1
माझ्या बरोबर पुन्हां चलतेस कांग ॥
माहेरूनी परत येउ उद्यां सकाळी' ।
बोले प्रभा मग तिला तरि त्याच वेळीं ॥ १ ॥

' मामी, तुम्हींच नव्हतें मज काय नेलें ? ।
तेव्हां तिथें मज रडें मग रात्रिं आलें ॥
माई चि आठवण आलि मला बरीच ।
येतें रडें न मजला कधिं ही उगीच ॥ २ ॥

' तेव्हां तुम्हीच म्हटलें मज नाहि मामी' ।
' आतां न आणिन कधीं ही पुन्हां तुला मी ॥
झाली तुम्हींच म्हटलें पुरती परीक्षा ।
मी लावली कशि तुम्हां न च काय शिक्षा ॥ ३ ॥

आतां बरोबर कशी मग मी चलेन।
कोठें तरी तुम्हि बघा लपुनी बसेन ॥
नेणार नाहिं मज तुम्हि न मीहि येई।

मामी कडेवर तिला उचलून घेई ॥ ४ ॥

हें काय बाळ अशि रागवशी उगीच '
त्या रात्रि तूं कशि हि राहिली ना उगीच ।
त्रासून तें उगिच मी म्हटलें तुला ग! ।
जाईन घेउनि तुला चलतेस का ग ॥ ५ ॥

पाहीन मी कशि अतां पळशील तूं ती ।
तूं गोड फारच तुझी मज फार प्रीती ॥
हो, मी चलेन दिवसा न अडें रडे मी ।
झोपेंतं ये जरि रडें करूं काय मामी॥ ६ ॥

—----

## कृष्णा

थट्टेनें कधि माउ मांजर कधीं आम्हीं म्हणावें तिला ।
जों पर्यंत किशी असे हंसत तों हें योग्य वाटे मला ॥
' आहे मांजर नी तरी हि असुंद्या' रागावुनी एकदां ।
बोले ती मग हो अम्ही ठरविलें, आतां न बोलूं कदा ॥ १ ॥

जों जाणीव तिला मुळीच नव्हती आत्मस्वरूपाचि ती ।
तों आम्हीं म्हटलें, पुढें मग तिला वाईट वाटे किती ! ॥
लोकांचे धरि तोंड कोण ! ! वदती थट्टेत किंवा तसे ।
कां हो ही तुमचीच काय मुलगी? झालें असें हें कसे ? ॥ २ ॥

आहे भिन्नच रंग रूप मुलगी कृष्णा न ही आपली ।
जेव्हां अर्थ तिला कळे सहज ती खिन्नामनीं जाहली ॥
चित्राच्या अतिशुद्ध भाव-पटलीं मालिन्य वाटे शिरे ।
संध्याकाळिं प्रफुल्ल पद्म - उदरीं संकोचता संचरे ॥ ३ ॥

बाई एक नवीन एक दिवशीं येणार होत्या भल्या ।
मोठ्या थोर, बजाविते म्हणुनि ती आईस हो आपल्या ॥
जेव्हां त्या पुसतील गे मु लगि ही कोणाचि कृष्णा असे ।
सांगायास चुकूं नकोस अगदीं माझी असेहि असें ॥ ४ ॥

—---

# झोपाळयावर चें गाणें

करूं कसे देवा, हृदयाचें झालें तुकडे । हृदयाचे झाले तुकडे ।
पाहीकाही थोडे दैवां, आतां तरी इकडे । दैवा आतां तरी इकडे ॥ १ ॥

ठेविशी गरीबाच्या धना ठेवितोस बंधनीं । अरे धनास बंधनीं ।
नाहीं जणू काय त्याचा कोणी जगीं धनीं । त्याचा कोणी जगीं धनीं ॥ २ ॥

जें माझें सारें कारे नेतोस काय म्हणून । कारे नेतोस काय म्हणुन ।
न्याय काय जाय हाय ! जगास सोडून । हाय जगास सोडुन ॥ ३ ॥

आंधळयाची कांठी घेशी कांही विचारीरे । घेशी कांहीं विचारीरे ।
झाली माय काय गाय दीन बिचारीरे । गाय दीन बिचारीरे॥ ४ ॥

म्हातारी मी मज देवा, कोण अता तारी ! देवां कोण अतां तारी ।
कुठें जाऊं सांग कशी फिरूं दारोदारीं । कशी फिरूं दरोरारीं ॥ ५ ॥

घेशीस माझा खरा खरा हिरा हिरावून  खरा खरा हिरा हिरावून ।
देइल कोणी का त्याला आणून धांवून ! । त्याला आणून धांवून ॥ ६ ॥

असुनी कीं नसुनी जी आहेत सारखीं । अरे जी आहेत सारखी ॥
आणखीही  माझी मुलें गुणास पारखी । मुलें गुणास पारखी ॥ ७ ॥

तांब्या भर पाण्याचा हि त्यांचा न आसरा । अहो त्यांचा न आसरा ॥
आहे त्यांच्या मनीं सारा प्रेमाचा कीं झरा । सारा प्रेमाचा कीं झरा ॥ ८ ॥

बघतात काय एकमेकांस पाण्यांत ! । एकमेकांस पाण्यांत ।

नाही कोठें माझ्या असे जगांत पाहण्यांत । असे जगांत पाहण्यांत ॥ ९ ॥

परक्यांच्या लाथा बुक्या खातात प्रेमानें । बुक्या खातात प्रेमानें ।

लाथाडती मज पण सदैव नेमानें । पण सदैव नेमानें ॥ १० ॥

भांडत बसतील बसतिल न रीकामें । बसतिल न रीकामें ।

दुसऱ्यांची करतील सारी सराकामें । अहो सारी सदा कामें ॥ ११ ॥

अंधारामध्यें आले कीं हो त्याला न्याया । आले किं हो त्याला न्याया ।

उजेडांत जणुं वाचा फुटेल अन्याया । वाचा फुटेल अन्याया ॥ १२ ॥

दटावति माझ्या घरीं मलाच हें हो का । अरे मलाच हे हो का ।

दया माया कांहीं नाहीं मुळींच कीं लोका । नाहीं मुळीच कीं लोका ! ॥ १३ ॥

' कांहो घरां देहांतुन माझ्या प्राणा ह्याला नेतां । माझ्या प्राणा ह्याला नेता ।

अंधारांतुन जो मला खरा नेता । जो मला खरा नेता ॥ १४ ॥

कुणाच्या डोळया मध्यें सलणारा न हा बाळ । सलणारा न हा बाळ 1

गरीबाचे कधीं पाहुं शके न हा हाल ।पाहुं शके न हा हाल ॥ १५ ॥

कधीं कोणाच्या न जातो माझा राजा वाटे । जातो माझा राजा (न) वाटे ।

त्याशी बोले त्याच्या चित्तीं प्रेमा वाटे दाटे । चित्तीं प्रेमा वाटे दाटे ॥ १६ ॥

गलबला नको करूं आई तुलाच सांभाळू । आई तुलाच सांभाळू ।

तुला आम्ही पाळूंतूं ह्याला नको भाळू । तूं ह्याला नको भाळू ॥ १७ ॥

भिउं नको आई, आम्ही तुझीच लेंकरें । आम्ही तुझीच लेकरें ।

धरु तुझा हात चालवूं तुला करें । अग चालवूं तुला करें ॥ १८ ॥

ठेउं आई तुला सजलेल्या बंगल्यांत । सजलेल्या बंगल्यांत 1

नको देउं तुझ्या हंसा अम्हां बगळ्यांत । हंसा अम्हां बगळ्यांत ॥ १९ ॥

'काय केलें ह्यानें सांगा ह्याचा काय गुन्हां! । सांगा ह्याचा काय गुन्हा ? ।

आहे माझा सोन्या शाहणा करिन पुन्हा । शाहणा करिन पुन्हां ॥ २० ॥

छाटुनिया जीभ बांधता हातापाया । बांधता हातापाया ।

कुणां गयावया करुं पडूं हातापाया । करूं पडूं हातापाया ॥ २१ ॥

' आमचेंन तेज ह्याच्या पुढें कांहीं पडे । ह्याच्या पुढें कांही पडे ।

धुंडियले जग पण असा न सांपडे । पण असा न सांपडे ॥ २२ ॥

पदोपदीं येतो चैनीच्या किती आड । चैनीच्या किती आड ।

ठेऊं म्हणुनीग दृष्टिच्या ह्याला आड । अग दृष्टिच्या ह्याला आड ॥ २३ ॥

येवो लवकर ताळ्यावर पुढें हा ग । ताळ्यावर पुढें हा ग ।

जननि ग भजनीं आमच्या अतां लाग । आमच्या अ तां लाग ॥ २४ ॥

ह्या म्हणण्याच्या मनिं उठे न प्रतिनाद । मनिं उठे न प्रतिनाद ।

त्या नाद सोडूं ह्यांचा धरूं कसा नाद ! । ह्यांचा धरूं कसा नाद ॥ २५ ॥

ती हसली थोडी हंसण्यात दिसे खेद । हंसण्यात दिसे खेद ।

तिच्या मनीं येतां मुलां मुलांतला भेद । मुला मुलांतला भेद ॥ २६ ॥

ओढुनि नेती !! त्याला टकलावूनि पाही ती । टक लावूनि पाही ती ।

अशी कशी मनीं म्हणे देवा तुझी नीती । अरे देवा तुझी नीती !!! ॥ २७ ॥

—------

# 'तुम्हिंया ! पण याल हो कधीं !'

तुम्हिं या! पण याल हो कधीं ? ।

क्षण एकैक असे अमूल्य हा ॥

तुमच्या मुळिं आडमी कधीं ।

हृदयेशा, अगदीं न येइन ॥ १ ॥

लपतें जरि दृष्टि आड हें ।

क्षण चन्द्रानन नाथ आपलें ॥

मन एरविं घाबरे ! अतां -

अग बाई, म्हणणें पुढें पुरे !!! ॥ २ ॥

पडलें शयना वरी अशी ।

किति झाले दिन मी अभागिनी ! ॥

अगदीं न उठेन यांतुन ।

कसला हा मज लाभतो हिरा !! ॥ ३ ॥

तरि शेवट ची कराञ्जली ।

पाडल्या हो पडल्या समर्पिते !! ॥

विसरा अपराध हो मम ।

अथवा जा विसरून कीं मला ॥ ४ ॥

अपल्या हृदयास जाणते ।

जरि जातां पण याल सत्त्वर ॥

अथवा तिकडे तुम्ही, व मी ।

इकडे भन्न पथां क्रमूं अतां !!! ॥ ५ ॥

म्हणजे पथ मोकळा तुम्हां ।

मग हो अध्ययना सुखें करा ॥

अजरामर नांव आपलें ।

चिर राहो जगतीं यशोमय ॥ ६ ॥

न घडों विस्मृती कधीं ।

अपल्या निर्मल रम्य मानसीं ॥

प्रतिबिंबित बिंब रूप मी ।

हृदयीं सतत नाथ ! राहिन ॥ ७ ॥

जड जर्जर देह सोडुनी ।

हृदयेशा, हृदयांत आपल्या ॥

पटकाविन गौरवें स्थळ ।

धरुनी केवल भावरूपता ॥ ८ ॥

हृदयीं निवसेन होउनी ।

गतकालीन भवत्सुख स्मृति ॥

चमकेन प्रकाशरूप मी ।

अपल्या हृन्नभिं दिव्यतारका ॥ ९ ॥

अथवा प्रतिभास्वरूप मी ।

मधुरा मङ्गल भावना मयी ॥

विहरेन मनांत आपल्या ।

करण्याला रमणीय जीवना ॥ १० ॥

कुणिं ये  दुसरी जरी प्रिया ।

करण्याला प्रिय आपलें पुढें ॥

मम मत्सरहीन मानस ।

आम्हि दोघी हृदयीं सुखे वसूं ॥ ११ ॥

भरूं जीवन - सौख्य - सौरभा ।

पति देवा! सुमनांत आपल्या ॥

उधळूं आम्हि शुद्ध मानसें ।

शिरिं निष्कण्टक पुष्प - संतति ॥ १२ ॥

—----

# परीक्षा

येतां पेपर सर्व दृष्टि किरणें केन्द्रस्थ मेजा कडे '

औत्सुक्यें वळलीं तशी विवृतशीं कांहीं मुखें जाहलीं ॥

वाटे कीं उरही उडून वदना वाटे च निघे आंतुनी बाहेर ये ॥

चित्तक्षोभ असा कुठें दिसतसे बिंबून तोंडावरीं ॥१॥

कोणी शान्त गंभीर तोंड करिती क्षोभास झाकावया 1

' मित्रा आज मुळीं मला न भय रे !' बाता अशा मारिती ॥

पाही पेपर तों लगेच खरकन् कोमेजलें तन्मुख ।

थोड़ीं पुष्पमुखें कुठें हंसलिशी कांहींशि मीं पाहिली ॥ २ ॥

ताराथन्त्र कुठें परस्पर सुरुं निःशब्द रूपें दिसे ।

नाना लोचन चालनें कळविती संकेत चित्रांतले ॥

कोणाचीं वदनें अजून उघडीं डोळे सुविस्फारित ।

वाटे भीषण नृत्य पेपर करी त्यांच्यापुढें काय हा ॥ ३ ॥

आणाया जणूं भूतलीं सुर इथें  साहाय्य द्यायामुलां ।

कांहीं दृष्टि छतांस भेदुनि वरी स्वलोकी धुंडाळिती ॥

' वाग्देवी गणनाथ विघ्नहर तो विष्णू जगत्पालक ।

कोणी धांवुनि काय येइल  अम्हां तारावयाला मुलां ॥ ४ ॥

कोणी लावितसे समाधि स्फुरण्या प्रश्नोत्तराची दिशा।

तेव्हां तो जणुं काय गाढ तिमिरीं मारीत चित्तें बुडी ॥

जेव्हां विस्मृति गाढ व्यापुनि मनोव्यापार ती थांबवी।

त्याच्या सर्वहि कल्पना थकुनि कीं जाती विरुद्धें पथें ॥ ५ ॥

हातांच्या वळुनी मुठी धरिति हो कोणी कुठें मस्तकां।

कोणी ठेविति तोंड ते करतलीं ध्यातात प्रश्नोत्तरा ॥

जेव्हां कांहि स्फुरे तदा सरसरा चाले कशी लेखनी।

बोले निःरचन (?) सर्व हृद्गत कसें ही बोलकी कीं मुकी ॥ ६ ॥

झालें ठण् इतक्यांत तास सरला झालें मनीं धस्स ही।

अद्यापी नच प्रश्न एक लिहिला चित्रांत कोणी म्हणे ॥

डोकें मी इतकें जरी खुपसलें  कांहीं न ध्यानांत ये।

झाला तो हतबुद्धसा पुटपुटे योजीत युक्ति पुढें ॥ ७ ॥

त्याची दृष्टि अधोमुखी उचलुनी फेकी तिला दूर तो।

आला आळस त्यास फार जणुं कीं हातांस विस्तारितो ॥

वाटे त्यास कुठून काय उचलूं पानावरूनी जणूं।

त्याची दृष्टि सतृष्ण बाल मृगशी भीता दिसे घाबरी ॥ ८ ॥

ठं ठं दर्शवि दोन तास गत ते झाले कुणी व्याकुल ।
बोटें मोडुनि लागती कुणि तरी कीं खाजवाया शिर ॥
शून्या दृष्टि कुठें क्षणैक दिसली, चाले पुन्हां लेखनी ।
थै थै नाचत कागदांवर नटी डोळ्यांस ती हर्षवी ॥ ९ ॥
बोटांनी कुणि टोचती खुणविती दोस्तास हो आपल्या ।
थोडे ते सरकून येति जवळीं कानास फुंकावया ॥
येती कीं सहकार्य कांहि करण्या तों तीव्र' माइन्ड यू' ।
कानाच्या पडद्यांतुनी मनिं शिरे भग्नाश झाले किती ॥ १० ॥
' आहे प्रश्नच प्रश्न सोडवुं कसे!!! कीं प्रश्न सोडूं अतां ।
देवा काय करूं भरेच घटिका ! हा प्रश्न तूं सोडवी ॥
ठं ठं ठं इतक्यांत 'गेट अप' ही उद्भूत झाले ध्वनि ।
झाला हॉल तरङ्ग संकुल जणूं कल्लोल संनादित ॥ ११ ॥
जाती खिन्न कुणी अधोवदन ते . मंदावल्या पावलें ।
कोणी सत्वर जाउनि भरविती ना दें मुलें अंबरा ॥
वाटे बांध फुटून वारि - रयसा बालौघ वाटे वरी ।
वाहे हा, जणुं कीं अफाट दिसतो, झाली परीक्षा अशी ॥ १२ ॥

# गडकरी- स्मृति

२९.१.१९३२

**(गडकरींच्या वाङ्मय सेवेचा जो मध्यान्ह काल तोंच त्यांच्या जीविताचा उत्तर काळ होय. तथापि तितक्याच कालांत म्हणजेफक्त तपार्धांत त्यांच्या ज्या दिव्य प्रतिभे चा परिचय अखिल महाराष्ट्रास झाला तिचें पुण्यस्मरण या पद्यांत केलें आहे)**

कधिं निरभ्र नभांतुनि ये सर।
करूनि आर्द्र धरातल सत्वर॥
चमकुं लागत जों रविच्या करीं।
तंवविलीन दिसे वरच्या वरी॥ १॥

निषीदिनीं चमके जरि काजवा।
न पथदर्शक अंधुकसा दिवा॥
क्षणभरी तळपे बिजली वरी।
पसरवी द्युति दिव्य दिगंतरी॥ २॥

गगनिंच्या निकषो पलिं काढुन।
किरणरम्य हिरण्मय पावन॥
हृदयीं कांतिमती, स्मृति राखुनी।
कुणिं कुठें लपते नभिं चांदणी॥ ३॥

अवतरे क्षितिजावरची प्रभा।
क्षितिवरी जणुं कीं प्रतिभानिभा॥

गडकरी कवि राम सभाश्रयें।

हृदय मण्डल व्यापुनि ती स्वयें - ॥ ४ ॥

तळपुनि तप अर्ध तपस्विनी।

उडुनि जाय नभांत यशःस्विनी ॥

हृदयीं मङ्गल भाव निबन्धनीं।

स्वकृतिरूप स्मृती जगिं सोडुनि॥ ५ ॥

—-----

## पतिच्या छायाचित्राकडे पाहून अत्यवस्थ रुग्ण पतिव्रतेचे उद्गार

जरि कांहि उगीच वाजले।

कुणि आले? पुसते किती तरी ॥

किति व्याकुल ती सती दिसे।

पुसते ती किति वाजले किती ॥ १ ॥

' इकडे पडलें अशी , तरी।

तिकडे कांहिं मनीं न मानसीं ॥

न च पत्रहि ये न भेट ही।

मज अर्धी पुरतीहि होतसे ॥ २ ॥

नुसतें मम एक वाच्छित ।

बघतां मी बघतां तुम्हां कडे ॥

मम जीव उ डो . तनू तुनी ।

मनि नेत्रीं भरतां भवच्छवि ॥ ३ ॥

जलधींत तरङ्ग व्यापि ्तो ।

पवनाच्या लहरींत नाद ही ।

अवकाश दिगंतरामधें ।

अवकाशांत प्रकाश संचरे ॥ ४ ॥

तशि नाथ, मनोहरच्छवि ।

दशदिग्व्यापुनि अन्तरीं वसो॥

मग त्यांत विरो विलीन मी ।

पति देवा ! परमैक्य हें घडो ॥ ५ ॥

—----

## खरो - वैशाखनन्दन :

वैशाखनन्दन गरीब उभा पहा  हा।

जो भस्मचर्चित तनू दिसतो अहा हा ॥

ध्यानस्थ संस्थित विचार सुमग्न योगी।

किंवा प्रिया विरह कातर हा वियोगी ॥ १ ॥

मोठा सोशीक फार सहिष्णु रजनीदिन भार वाही।

राही अधोवदन संकट सर्व साही ॥

कर्तव्यदक्ष करि स्वीकृत कार्य नित्य।

मागे प्रमोशन कधीं न वदे असत्य ॥२॥

त्याच्यांत हो न दिसली कधिं ही लबाडी।

निष्पाप चित्त शिशुसें; शिशुसा खिलाडी ॥

त्याची असे पुसतसां जरि काय चूक।

कामें करी सकल तो अगदीं अचूक ॥ ३ ॥

झांकी देह विभूतिमेघ पटलें , तेजोनिधी अंतरीं।

रक्षेच्या कवचास घालुनि जणूं , हा आत्मरक्षा करी ॥

किंवा निद्रित गव्हरान्तरिं हरी झांकी स्वतेजास हा 1

येता योग्य सुसंधि हा प्रगटवी संताप - सत्ता पहा ॥ ४ ॥

आवेशें खर सिंहनाद करूनी झाडी दुगाण्या पुढें ।

हल्ला तो चढवी ; अशा क्षणिं कुणी येवो न मागे पुढें ॥

सेतू सैकत क्षुब्ध वारिधि पुढें तो बापुडा काय सा ।

जिंकूनी रिपुला जय- ध्वनि करी तेजें असें हा असा ॥ ५ ॥

पाहूनी दुरुनी निज प्रणयिनी ह्याची प्रिया जी खरी ।

लागे कीं प्रणयात्मगीत म्हणण्या त्याची खरी वैखरी ॥

गाई गायन मुक्तकण्ठ गवई कीं राग तोषाढव ।

ऐशा ह्या रसिकास कां म्हणतसां निंदून हो गाढव !!!॥ ६ ॥

जाणी हा अनुराग राग महिमा एवं असामान्य हा ।

ह्यांचे दूषणरूप नांव जगिं कां ? आहे असा मान्य हा ॥

गद्धा गाढव गर्दभेश्वर अशी संपूर्ण नामावली ।

आहे यास अयोग्य मानव किती यत्पापिनी सांवली ॥ ७ ॥

—----

# रक्त - पीती

(हिंदुस्थानच्या नकाशाला असलेली)

जाईल काय कधिं भारत- रक्त - पीती।

हे रक्त काय किति शोणित भक्त पीती॥

ह्या भारतास जळवा (हिन्दी = जौंक, English= Leech) जणुं शोषण्याला।

कीं लागल्या स्वतनु संतत पोषण्याला॥ १ ॥

हे रक्तबीज असुरासम सक्त रक्तीं।

त्यांच्यास्तव प्रगट मोहन (M K Gandhi) दिव्य शक्ती॥

ठेवा तिला तुम्हि कितीहि नियंत्रणांत।

राहील काय जड प्राकृत बंधनांत ! ॥ २ ॥

कोठें निघेल दृढबंधनें तोडुनी ती।

जाणेल प्राकृत मनुष्य कसा कुनीती॥

राहीन कंस कर पिञ्जर बंधनांत।

गेली उडून निसटून करी क्षणांत॥ ३ ॥

मेघांच्या जरि गाढ बंध - पटलीं विद्युद्युती झांकते 1

डोळे ती मिचकावुनी निसटते आत्मप्रभा फांकते॥

किंवा निर्मळ चंद्रिका घनतमें डांबून कीं ठेवितां 1

भाले भोकंसुनी शशी प्रगटवी दिव्यप्रभा तत्त्वतां॥ ४ ॥

फोडूनी हिमवच्छिला - हृदय ही गंगा जगत्पावनी ।

धो धो धूत मला प्रवाह पसरी बंधास ती तोडुनी ॥

तैसी मोहन - दिव्य - शक्ति पसरो श्रीभारतानन्दिनी ।

होवो वंदिनि ही सदा - शिव - परा आनन्द - निष्यन्दिनी ॥ ५ ॥

—---

# आहेस तूं न मुलगा, न तुझी हि आई !

आहेस तू न मुलगा , न तुझी हि आई ।

कांद्या व भाकरिंत ती तुज सत्य घेई ॥

वाटेल तूं तर खुशाल तिला विचार ।

हें ऐकतां विविध उद्भवले विचार ॥

झालें मलूल मुख तेज विहीन दृष्टि ।

वाटे अतां नयन कीं करितात वृष्टि ॥

डोळ्यांस तो पुसुन, जात पुसावयाला ।

आईस भाव अपला कळवावयाला ॥ २ ॥

धावे पुढें दुड दुडा बघतांच आई ।

ती सांद्र प्रेमरसमूर्ति समीप येई ॥

प्रेमा उचंबळत पाहुनि त्या शशाङ्का ।

चुंबून त्यास बसवी वर ती निजाङ्का ॥ ३ ॥

' आई' म्हणे तनय' काय न मी तुझा ग ?' 1

माझी न तूं जननि काय खरेंच सांग ॥

फुंदूनं बाळ पुसतो हुंदका न राही ।

चित्तव्यथा अकथनीय कुणा नरा ही ॥ ४ ॥

' माझाच तूं उगिच ते म्हणती तुला रे ।

राही उगी छबुकल्या प्रिय बालका रे ॥

ऐकून हें मुदित मानस बाळ झालें '

हे पाहतां जननिचें मन पूर्ण धाले ॥ ५ ॥

डोळें भरून बघतां निज बालकातें ।

डोळे भरून मग येत पुन्हा पुन्हांते ॥

वात्सल्यपूर्ण हृदयीं उठले तरङ्ग ।

जाणील केवळ ज्या रसिकान्तरङ्ग ॥ ६ ॥

—------

## प्रभा व प्रतिभा

बाला मत्प्रतिभा असे जणुं प्रभा ती ह्रस्व तीच्यांतली ।
काढी स्वोदरिंची पुन्हां उदरिंती' ती' च्या जणूं जन्मली ॥
होई मूर्तिमयी प्रभाच प्रतिभा ती स्थूल देहांतरीं ।
तीही होउनि दीर्घ कीं तिचि दिसे मातास्वरूपें तरी ॥ १ ॥
दोघी ह्या मिळुनी प्रसन्न करिती पूर्वींच माझे मन ।
पूर्णेन्दू सम बाळ इंदु प्रगटे जेव्हां प्रभे मागुन ॥
कुंजाच्या लतिके वरि हृदयिंच्या इंदु प्रभा फांकली 1
अंतर्दृष्टि विकासली उमलली प्रत्येक मुग्धाकळी ॥ २ ॥—-----

# स्फुट कविता

बाळांचे हंसणे तसेंच रडणें अस्पष्ट बोलणें ।
नाना खेळ विवाद रम्य सगळे रागावणें भांडणें ॥
प्रेमें तें जननि बघे; अमृत ती त्यांच्या वरी वर्षवी ।
सांचे जे हृदयाञ्जलींत  पतिच्या त्याला किती हर्षवी ॥

अभंग

माझी बाळ प्रतिभा भिंगोरी सारखी । फिरे ती सारखी एकटीच ॥१ ॥
कोणाही न वाटे परकी पारखी । गाजर पारखी सोडुनीया ॥ २ ॥
कधीं ही कोणाला काहि ही न मागे । प्रेमानें ती वागे भावंडाशी ॥ ३ ॥
पुढें खांऊ येता न च लागे खाऊ । नैवेद्यासि ध्याऊ लागे पण मनीं ॥ ४ ॥
हळूच परन्तु करी वर डोळे । अगदींच सोंळे दिसले जे ॥ ५ ॥
हिरकण्या माझ्या कुणा न  हो डोले (ळे?) l भरूनी हो डोळे पाहातांना ॥ ६ ॥

—----

कसा माझा राघू मधुर वदतो मोहक गिरा ।
कसा माझा मैना मुखिं झर झरे प्रेमळ झरा ॥
सुगंधी वायू ची झुळुक पसरे मानस सरीं ।
तिथें आनंदाच्या मृदुल उठती रम्य लहरी ॥

—----

काया निरोगी पहिले असावी । कार्यानुकूल सुशिला मिळावी ।
सुसंतति द्रव्य हि प्राप्त व्हावे । तेथें पुढें स्वर्ग सुखा पहावें ।—---

***

जगज्जननि पार्वती सतत प्रेम वृष्टी करो।
सदाशिव तुम्हा वरी सतत छत्र छाया घरो॥
तुम्हा गणपती सदा सकल विघ्नहर्ता असो।
सरस्वतिहि इंदिरेसहित ऋद्धि सिद्धि वसो॥ १ ॥

***

जेथें पार्वती ही सदाशिव वसे देवांस देवास जी।
खेळे खेळ अनेक सृष्टिरमणी दे हर्ष चित्तास जी॥
तैशा सुन्दर रम्य कुक्षि सुभगा जी जन्मली नन्दिनी॥
पावो नित्य समृद्धता अलकनन्दा ती सदानन्दिनी॥ २ ॥

(राग-देश-त्रिताल.. म्हारी सुध o)

***

## रामाचा हा राम राम राम घ्यावा।

केव्हांही कधीही रामा चा कुणाही विसर मुळींही न पडावा॥ ध्रु० ॥
कोणासी केव्हांही कधींही चुकोनी बोललेला शब्द विसरावा॥ १ ॥
पवार कुलासम यादव कुलांत बलवंत यशवंत व्हावा॥ २ ॥
पितामाता यांनी जन्मदिवोत्सव अनन्तसमयीं करावा॥ ३ ॥
आनन्दी आनन्द होता मग ऐसा आनन्दांत राम आठवावा॥ ४ ॥

**Note*** ह्या कविता श्रीमंत खासे साहेब (सदाशिव राव) पवार ह्यांची ज्येष्ठ कन्या श्री. सौ. अलकनन्दा बाई जाधव (यादव) यांच्या जन्म दिनीं (ता ६.८.१९२८) ला रचून त्यांना अर्पण केल्या होत्या.** Note:Shreemant Khasesaheb Puar was erstwhile Home Minister at Gwalior Regency, Later he became the Regent in his own right at Dewas Jr)

## बाला

अति सुंदर कोमले लते । अशिकां घालिशि मान खालते ॥

कधिं वेळ लवेल का अशी ? झुळुके नें अधरांतल्या कशी ॥ १ ॥

किति लाल कपोल जाहले ! । मुखरागें मम जें न रंगले ॥

किति मौक्तिक बिन्दुच्या सरी । नवबिंदी छबि आणिति शिरीं ॥ २ ॥

हलतें उरीं वस्त्र किञ्चित । श्वसनानें तव काय कम्पित ! ॥

बसशी अशि दूर का पण ! । शरिरें केवळ भिन्न आपण ॥ ३ ॥

उघडो मुख मुग्ध कोकिला । नव वासंतिक दाखवो कला ॥

मनिं मौन व्रतस्थशी सती । लपली ती प्रगटो सरस्वती ॥ ४ ॥

मधुरा रस संयुता गिरा । अमृतस्यन्दिति मानसा सरा ॥

भम शीघ्रतुडुंब ती भरो । ममवृत्ती मग त्यांत त्या विरो ॥ ५ ॥

करवेष्टन बंधमुक्तता । मिळवो जानु त्वदीय तत्वतां ।

फिरवो विधि लोचना मना । जुळवो मंगलयोग योजना ॥ ६ ॥

—-----

## प्रेम - तरङ्ग

कशास मज ह्या प्रिये परमशुभ्ररदेशी नव्या।

कपोल मम टेकण्या तव उरोज गिर्द्या हव्या॥

अहा! विरल कञ्चुकी पटल शुभ्र अभ्रावरी।

सुधांशुयुग बिंब हेलपत रम्य अभ्रान्तरीं॥ १॥

कशास तशिही उशी मज उशास देशी अशी।

तुझा मृदुल हात हा धवल गोड माझी उशी॥

असो शिर भुजेवरी करित स्पर्श वक्षःस्थला।

कपोलहि तसे तुझे जवळ फुल्ल राहो मला॥ २॥

शशाङ्क मुखचन्द्रिका पसरली शरीरावरी।

अनुपम तनु तुझी म्हणुनि रम्य शुभ्रा खरी॥

विहार करण्यास हें जरि धरीं (घरीं ?)फुले चांदणें।

घरास मग सोडुनी फुकट हें असें हिंडणें॥ ३॥

जाई दृष्टि तुझी मदीय हृदयीं हा वेध वाटे बरा।

डोळे हे मम भेदुनी विरलशा जाती तुझ्या अंबरा॥

राहो बद्ध सदैव चित्त अपलें प्रेमाचिया दोरकीं।

बालांच्या मधुमुग्ध मङ्गलवचें सदगन्धिं लागोत कीं॥ ४॥

—------

# कलह

**(कोणत्याही रोगाचीं लक्षणें वैद्य बोवाला दोष फार कुपित झाल्याशिवाय एकत्र पाहावयाला सांपडत नाहीं. पण पुस्तकांतून लिहून ठेवणें अवश्य आहे)**

भांडा भांडा भाऊ बहिणी मारा एकमेका ।

उठा बहिणिंनों भांडू आपण या, मारुं एकमेका ।

झिंज्या ओढा ओरबडू तुम्हि पण नुसत्या बसतां कां ? ॥

दांत खाउनी करकर करकर करास चावे या घेऊ ।

कडाकडा या भांडूं आपण फडाफड घेऊ देऊ ॥

उठा उठा ग! स्वस्थ नका बसुं धिंगा मस्ती करू सुरु ॥

जिभा . वांकुल्या दावू घेऊ चिमटे मारू लाथा या ।

देऊ ढकलुनि एकामेका प्रेमानें मग भेटाया ॥

आकाशांतरि मेघ भांडती वीज कडाडे मधे कधी ।

भावा बहिणी मध्यें भांडण चालो ऐसे कधी मधी॥

लागो ऐशा नित्य कलागति प्रेमोद्यानांतिल कुंजीं ।

नखक्षतें ही हृदयीं होवो प्रेम फुलो पण मुख कंजीं ॥

प्रेमकलह रुचि सर्वां देवा, दे वाटे मज वाट बरी ।

जिथें मिळे प्रभु खरी पहाया प्रेम रसाची मौज खरी ॥

ऐका श्रोते भांडण हें तुम्हि भांडण लागो भवदगृहीं ।

म्हणोत कुणि हे खुशाल मजला नारदमुनि हा कवि कलही ॥

घालवुनी संताप किल्मिषां मनो भूमिला गार करो l

अश्रु वृष्टिनें नटोत लतिका जलकण नवशृंगार धरो ॥

नवानुरागें चमकूं लागो विकसित हृदयाची सृष्टि ।

धन्य भांडणें धन्य मेघही वीज सुधन्या तशि वृष्टि ॥

फलश्रुती ही ऐकुन घ्यावी भांडण होइल घरोघरीं ।

थांबेल कधीं सांगू मी का ? उठाठेव मज उगिच परी ॥

—--

# चूक

श्रीमन्मगलधाम मन्दिर तुझें पाहून लोटांगण 1

घालिं मी मनीं; होत मद्‌हृदय ही सद्भाव लीलाङ्‌गण ॥

झालें गद्गद अंतरंग बघतां दारांत डोकावुन ।

वाटे ओझरतें तरी शुभ तुझें व्हावें मला दर्शन ॥

माझे हे कपडे भिकार असती मुद्रातशीं बावळी ।

कोणी देइल का उपासक दुजा हांकून मातें बळी ॥

जाणाया मम अंतरङ्‌ग महिमा नाहीं तुझ्या वाचुनी ।

येशी का ढकलावया तरि जगीं मी धन्य कीं वांचुनी ॥

आशालावुनि मी उभा पण कुणी  दारास लावीतसे ।

पाहूनी मग पायरी, जमवुनि पायास तेथें बसे ॥

लावी नंतर कान ध्यान सगळे चाहूल येवो तरी ।

आशेची दृढ कास मी धरितसें लावून डोळे वरी ॥

झालें; लक्ख उजाडलें ; निवळलें डोळयावरीचें धुकें ।

चोखाळून क्रमें स्वमार्ग कळतां रात्रीस कोठें चुकें ॥

—-----

# स्नान

आनन्दें बसलो समुत्सुक मनें रंगीत चौरंगिं मी ।

भांडीं स्वर्णमयी सुगन्धितजलें नाहीं। कशाची कमी ॥

होतीं कीं उटणीं मनोहर उट्या आंगास लावावया ।

मी सोत्कण्ठ असें कुणि तरि दिसो स्नानास घालावया ॥

डोळयांचीं बुबुळें सतृष्ण वळलीं दाराचिया बाजुला ।

ओकावून लवून प्रेम लतिका आडून पाही मला ॥

येवो ही कुचकुंभनी स्मितयुता उत्फुल्ल नेत्रा स्वतां ।

जावो न ललचावुनी मज अशी स्नानानं कीं घालतां ॥

तुझ्या चन्दन चंद्र शीतल करें संताप माझा पळो 1

श्रीमन्मङ्गल दृष्टिची मजवरी पीयूष वृष्टी गळो ॥

वाटे हृत्कमळीं सहस्र दळिं मी राहो सुसिंहासनीं ।

कोंडो कोमळ पाकळया सकलत्या ह्या कोवळया बंधनीं ॥

मानी मानस पूजनार्थ विमलामूर्ती अनन्यामम ।

सद्भावाञ्जलि अर्पुनी सुरुं करी विद्युल्लता विभ्रम ॥

—------

# लतिका

लावाया लतिकेस ह्या न महिने झाले अजूनी दहा।

तों झाली तनु पुष्पिता विकसिता शोभा अपूर्वा पहा॥

डोले ती नवयौवनें मद भरें या(व)या फळें लागलीं।

झाकीं मत्तनु पल्लवान्तरिं तिची ही सांवळी सांवली॥

गाढालिङ्गनिं ती मला कवळिते लागो मला न झळ।

घेते ताप शिरीं समर्पुनि मला छाया तिची कोमळ॥

पुष्पांच्या सुपराग मञ्चकिं बसें शाखाश्रया खालते।

आनन्दें करपल्लवां वळवुनि मन्नेत्रती झांकते॥

खेळे खेळ अनेक ती मजसवें वायूसवें मानिनी।

हाले चञ्चल अञ्चला सह तनू सारी मनोमोहिनी॥

होती हे सुमगुच्छ ही तरलित स्पर्शे कसें वायुच्या।

प्रेमाचे मृदु हे कराञ्जलि मधें झेलेच किंवा तिच्या॥

चाले नर्तन मुग्धगान नयनीं दोघांचिया मानसीं।

पुष्पें वर्षति हर्षती उभय ही चित्तैक्य होतां रसीं॥

—-----

# काय जणं बाई कशि आवडते!

काय जणं बाई कशि आवडते !

मज वाचुनि  कां इतकें नडतें ! ॥ ध्रु० ॥

वाटे तुमचें सगळें लटके 1

उडती अपलें किति तरि खटके ॥

लागति चटके क्षण मन भटके ।

परतुनि परतच मनिं मन जडते ॥ १ ॥

रागावुनि मी किति बडबडते !1

मागाहुन मज किति भडभडते॥

उर मग उडतें किति धडधडतें ।

मग मुख बघण्या टकटक बघतें ॥ २ ॥

वळुनि वळुनि तुम्हि बघतां, मागें ।

हुर हुर मम मनिं किति तरि लागे ॥

डोळ्याची न तहान भागे ।

दूरदूर बघतच बसते ॥ ३ ॥

भोळ्या भाळ्या मज भुलवाया 1

खटपट लटकी तुमची वाया ॥

लटपट सगळी कळे मना या '
अशि न च मी ही उगिचच फसते ॥ ४ ॥
सुमधुर हंसणें, गोड वागणें ।
गोड बोलणें, गोड चालणें ॥
ठाउक साखर तुम्हां पेरणें ।
फसे न मी का तुम्हा वाटते ॥ ५ ॥
धरितां कर मग उत्तर द्याया '
फिरे तिचें मुख कलली काया॥
लागे अधरीं स्मित चमकाया '
वळवुनि बुबुळें तिरपीं बघते ॥ ६ ॥
डोळयांच्या मग पुतळया भिडती 1
कल कल कल मनिं मैना करिती ॥
प्रवाह सळ सळ वाहुं लागती ।
हृदयकुञ्जवन फुललें मग तें ॥ ७ ॥
प्रशान्तकुञ्जीं खेळ खेळली ।
द्वैतभावना सरिता वळली ॥
जलधि जलान्तरीं समरस झाली ।
एक विषय मय तन मन दिसतें ॥ ८ ॥

—------

## डोळे

हे कासार सुलोल लोचन तुझे सुभ्रूलता मालिका।

बिंबे मन्मन तेथ सूक्ष्मतम  हें होऊन कीं तारका॥

नेत्रांची छबि झांकिती वरिवरी ह्या पापिणी पापण्या।

किंवा त्या लवतात  मग झांक झांकुनि तिथं तेजा तिथें ठेवण्या॥

हाले ही भृकुटी तशी कृशतनू मच्चित्त हो हालवी।

काया ही मम हर्ष - फुल्ल फुललें रोमाञ्च कीं पालवी।

संकेता कळवीति संकुचितशा ह्या पक्ष्मपंक्ती पहा।

निःसंकोचमनें मनास; हृदयें झेलीत मी त्या अहा॥

आहे कोण समर्थ ज्यास रमणी नेत्रांकडे पाहवे।

सांगू कोण शके मनोऽभिलाषिता- जें कांहि ह्यांनां हवें॥

भाषाभिन्न असे कळेल रसिका वाचून अन्या कशी।

तो पाही पडताळुनी उमटते चित्तीं जशीची तशी॥

ही दृष्टि लिहिते मनोहर करें हृत्पङ्कजाच्या दलीं।

तद्भावार्थ कळे; नये कळवितां; ही अर्पितो अञ्जलीं॥

—-----

## विनोद(वात्रटिका ?)

पाणी आंघुळिला कधींच तुमच्या आणून हें ठेविलें ।

छे; पाणी मजतें नको मज हवा 'पाणी' तुझा शीतल ॥(here पाणी= Hand)

लावाया नव अङ्गराग तनुला हा ठेवला आपल्या ।

वेडे दावि अनङ्गराग मजला वेडीमनीषा असे ॥

प्याया हें जल ठेविलें अमृतसें पेला भरूनी गडे ।

पेल्याचे जर कांठ ओंठ तव हे प्यायास पीयूष दे ॥

खायाला जिलब्या फळेंसुरस ही ताटांमधें वाढलीं ।

राहो ताट; मरन्द लोलुपमना तूं पान दे केवळ ॥

खेळूं आपण खेळ सारीपट मी फैलावुनि ठेविला ।

गुंडाळी; कुचकन्दुकाशि अपला हा खेळ वाटे बरा ॥

पर्यंका वरि हो अतां क्षणभरी विश्रान्ति घ्यावी तुम्ही ।

कोठें ही न मिळे मला मिळत  जो विश्राम अङ्कावरी ॥

आनन्दें झुलतो झुल्यावर जणूं अंकावरी मी तुझ्या ।

अर्धोन्मीलित नेत्र भाव हृदयीं माझ्या तुझे अंकित ॥

—-----

# पावलें

नाहीं पैंजण कङ्कण ध्वनि इथें नाहीं इथे कोकिला ।

नाहीं सुंदर सारिका न चिमण्या कोणी दिसे ना मला ॥

येथें नाचति पापण्या न भिंवया निस्तेज डोळे जसे ।

आहे कर्कश कण्ठ कर्णकटुहे येथें रहावें कसें ॥

खोडे ही फिरती इथें; नच अतां ज्यानां फुटे पालवी ।

आहे अन्य गडंग रंठ चरणें येथें कुणाला हवी ॥

ये ये येथ मना पहा उमटलीं जीं पाहशीं पावलें '

जेथें मुद्रित सूक्ष्मभाव मनिंचे स्थूलत्वकीं पावले ॥

आहे मार्ग त्वदर्थ चित्रित पदें हा रेंखला आंखला ।

गालीच्या नवगुंफुनी कुणि रजीं प्रेमों जणू घातला ॥ (प्रेमांत फैलविला)

आहे ह्यांत पहा तुझ्या हृदयिंचे सद्भाव रेखाङ्कित ।

जाई या पद लांछितें मृदुपथें लाभो तुला वाञ्छित ॥

होवो गद्गद कण्ठ पाहुनि कुणी सोत्कण्ठ डोळे तसे ।

भावोन्मीलन दाखवीत विलसो तोंडावरीचें हंसें ॥

—------

# मोटार

आली मोटर ही पहा धडधडा शिंगास ती फुंकित l
झांकी अंबर धूलि ने मळवि ही डोळयांत ही झोंकित ॥
पांथस्था! भिउं तूं नकोस; उघडे तूं ठेव डोळे इथें ।
वारा वाहून नेत धूलिकण ते वाहे विरुद्ध पथें ॥
तोंडाला फिरवूं नकोस नयना रोखून पाहीं तरी ।
आहे रम्य चिरंतनी प्रणयिनी मोरारिच्या अंतरीं ॥
पाहीं जाइल भर्र मोटर तशी पातें लवे ना लवें ।
जाई घेउन ती मनोरथ तुझे आंतील वीजे सवें ॥
आहे व्यर्थ पुढें किती तरि जरी चित्तीं तुझ्या कालवें ।
फोडो बांध उगीच त्वद्च्हृदयिंच्या कुञ्जांतले कालवे ॥
हाताला कर उंच तोंड उघडी सोत्कण्ठ मुद्रा कर ।
संकेता कर तूं तुझ्या भ्रुकुटिच्या मोटार थांबे तर ॥
हा भुंगा डसला कसा (अ) कुसमयीं ही पापिणी पापणी ।
झांकी नेत्र तशी तडित्; दिपवुनी गेली मनोहारिणी ॥

—----

## दादाचा राग

' रागावुनि हें बाळ उभें तरि समजावा त्याला' ।

ऐकुनि बाळा स्फुरण चढे मग फुगवी गालाला ॥

ऐक बाळा हें उगाचि रुसशी मळविशिकां आंगा ।

हवें काय तुज सांग मला तरि स्फुंदिशि तूं कांगा ! ॥

खाऊ घे तुज हवा असे तरि लागे जे घेई ॥

उगी उगी तूं चिमण्या बाळा स्वस्थ म मीं होई ॥

आली परतुनिं गाय घरीं तरि आतां चल बाळा ।

पुरें पुरें हें रूसणें चिमण्या समजवुं किति वेळा ॥

दूदू देउनि वासरास ती चिमण्याला द्याया ।

उत्सुक नेत्रें बघतें इकडे, चल दूदू प्याया ॥

तळमळती किति मैना पोपट करिती वळवळ ते ।

त्यांची मोहक भाषा चिमण्या केवळ तुज कळते ॥

तों ये रांगत बहिण धाकटी शिशु केविलवाणी ।

दड दड दादा म्हणतां गुंगवी शिशु वीणा वाणी ॥

भावाचे मृदुभाव तार जणुं वाजवि झण झण ती ।

नयन चिमुकले भावपूर्ण ते टक टक टक बघती ॥

ते जणुं म्हणती ' नाकांतुन बघ दादा हंसुं आलें ' ।

ऐकुनि दादा उचलुनि तिजला रागा सह गेले ॥

—------

## उचल कलेवल' (बोबडे बोल असलेली कविता)

उचल कलेवल' चलचल लवकल ।

तिकलुन येउन माई मालिल ॥

बघ तूं, इकलें तिकलें बघशिल ।

बसशिल येथें उगीच गमशिल ॥

आली ती बघ आतां तूं पल 1

आपल्याला कशि आतां पकलिल !!!

म्हणते ' कधिं तलिं घ लिं बलं येशिल '।

जाऊ नच घलिं आतां बिलकुल" ॥

—------

# संशय

दोन्हीं दारें जरि तुम्हि अशीं लाविली झोंप घ्याया।
दोन्हीं पातीं मुळिं न लवती कोठली नीज याया॥
दोन्हीं हातें उगिच तुम्हि या पापण्या घट्ट लावा।
चित्ताची ही लटपट तसा क्षोभ कैसा लपावा॥
घ्यावे तुम्ही वरवर असें सोंग आतां निराळें।
कांहीं झालें तरि पण तुम्ही शुद्ध नामा निराळे॥
येवो कोणी घुसुनि लुटुनी कां न सर्वस्व नेवो।
त्याची तुम्हा क्षिति न अगदीं कांहिही येथ होवो॥
माझी नाहीं स्थिति पण तशी वस्तु माझी न जावी।
माझ्या प्राणा हृदयनिधिला रक्षुनी मीच ठेवी॥
माझ्या रत्ना जरि कुणिं शिरे चोरूनी चोरण्याला।
प्रायश्चिता तरि मग तया लावि मी भोगण्याला॥
आहे येथें हृदयगृहिंची स्वामिनी एकटी मी।
वाटा कोणा मुळिं न मिळुं दे माझिया प्रेम धामीं॥

—-----

# काव्य कुञ्जा करितां प्रास्ताविक

ह्या 'काव्य ' विहारा कराया तुम्हीं कोकिला बालिका सारिकाया ।
याया शुकांनों तुम्हीं बालकांनों बसाया हंसाया फिराया रमाया ॥
आनन्द सुङ्गध सञ्चार येथें रमे सर्वकाळीं विहारी वसंत ।
श्रीशारदागीत नादें इथें हो भरे वायु गाती किती गोड संत ॥ १ ॥
गोदावरी नर्मदा पुण्य कृष्णा जलें पावनें पूत काया जयांचीं ।
जीं वाढलीं या महाराष्ट्र गंगा गङ्गा तटीं स्थूल मूर्ती जणूं भावनांचीं ॥
जीं सृष्टि देवीचिय अङ्गि अंकीं किती खेळली अंतरीं रंगलेलीं ।
झाडें. महाराष्ट्र रम्य स्थलीची इथें धुंडुनी लावलीं लागलेलीं ॥ २ ॥
धर्मार्थ कामादि देती फळांला चतुर्वर्ग प्राप्ती असे येथ सोपीं ।
साऱ्या रसांची इथें मेजवानी अजीर्णा न भीती किती‌पी अहोपी ॥
मज्जाव नाहीं कुणा मज्जनांला इथें सारखी वाहते ज्ञानगंङ्गा।
चित्ताचिया ओंजळीनें तुम्हीं प्या करा पावना आपल्या अंतरङ्गा ॥ ३ ॥
प्राचीन किंवा नवी काव्यमाला करें गुंफिली पुष्प संग्राहकाच्या ।
सोत्कण्ठ कण्ठीं कळो हृत्स्थळीं ही अलंकार रुपें रसग्राहकाच्या ॥
आहे मधाचें जणूं बोट हे कीं सुसाहित्य - उद्यानिं बालां शिराया ।
भ्रू-तर्जनी प्रेम संकेत कीं हा सराया पुढें बालकां चालवाया ॥ ४ ॥

अत्यल्प सा यत्न हा साध्य मोठें; तरी मोठमोठे महन्मन्य साधू ।

ह्या वाङ्मयक्षेत्रिं आहेत त्यांच्या कृपें आपल्या या स्वकार्यासिसाधू ॥

त्यांच्या करीं बालकांना समर्पूं रुची गोड सत्सङ्गती त्यास देवो ।

पाण्यांतुनी दूध काढावयाची विवेकात्मिका वृत्ति उत्फुल्ल होवो ॥ ५ ॥

—-----

# वेदाभ्यास

पाहूनि एक मुलगा बहुवेदपाठी ।

आली प्रभा कळवळून मनांत मोठी ॥

हा बाळ कोठवर धोकत हो बसेल ॥

ह्याची न जीभ कधिं काय मुळीं थकेल ॥ १ ॥

याला नसे मदत कोणी हि द्यावयाला 1

अभ्यास हा किति कठीण करावयाला ॥

हा एकटा म्हणत काय असें बसेल ।

ह्याला न शेंवट किंहो कधिं ही असेल ॥ २ ॥

' शब्द प्रचण्ड किति कोमल बालका तू ।

मोठे धडे उतरशील कडे कसा तू (किति लहान मुला असा तू) ॥

जेवावयास हि घरीं नच बालकारे ! ।

जाशील काय ? बसशील असाच कारे ! ॥ ३ ॥

केव्हां पासुन तोंड पाठ करिशी तुझा न संपे धडा ।

जीवाचा करूनी धडा उतरशी हा काय मोठा कडा ! ॥

बाळाहा बिकट प्रसंग दिसतो ह्याचा नसे अंत कीं ।

वेदाच्या जणुं वेदना पठनिंकीं अत्यन्त प्राणांतिकी ॥ ४ ॥

—-----

# भावाञ्जलि

हृदयिं ची अतिगूढ वनस्थली ।

रुचिर मानस रम्य पयस्तलीं ॥

उगवलीं कमळें भरलीं रसें ।

वर फुलें फुललीं फुललें हंसें ॥ १ ॥

बहरली मृदु कल्पकता लता ॥

मृदुल कल्पलता जणुं सन्मता ॥

दरवळे सुख सौरभ आंतला ।

हृदयिं एकवटे जगतांतला ॥ २ ॥

उडु गणीं रमणीं गगनाङ्ग णीं ।

विहरूनी मणि आणि सुलक्षणी ॥

प्रणय दोरक बंधनिं गुंफुनीं ।

मुदित कल्पकता खुलती मनीं ॥ ३ ॥

हृदयिं च्या वनिं मण्डप ती करी ।

मजि फुलें सुमनें मग द्ये करीं ।

मग मधोमध मंचकि श्रीहरी ॥

बसवुनि सुसमर्पित ती करी ॥ ४ ॥

गहिंवरे थकलें मन बोलणें।

हरि पदीं उरलें शिर ठेवणें॥

प्रगट ती ह्रदयी बहु भावना।

पण मुकी करि अर्पण आपणा (आत्मसमर्पणा)॥ ५ ॥

—----

## धोंडशास्त्री

होता गरीब मुलगा बहु वेद - पाठी।

त्याच्या हितार्थ गुरुजी करिं  घेति काठी॥

वाजे छमाछम छडी जमिनी वरी ती।

तो मान हात हलवीत अनेक रीती॥ १ ॥

पाठीवरी कधि मुकी छडि बोल बोले।

चित्तास ती  हलवी सत्त्वर मान डोले॥

गंभीर गर्जति गुरु कधिं वक्र दृष्टि॥

 होऊनि  क्षुब्ध करिती चपराक वृष्टि॥ २ ॥

चोळीत गाल सशिखा शिर हात हाले।

प्राणांत प्राण जणुकाय पुन्हाच आले॥

चाले अखण्ड किति वेळ स्वकंठशोष।

ऐका सदा रटन तत्पर बाल घोष ॥३ ॥

प्रातर्विधि उरकण्यास  गुरु निघाले।

पाहूनि फुल्लमुख बालक फार झाले ! ॥

वाटे जणूं क्षणभरी टळल्या उपाधी।

झालें स्वतंत्रमन लागतसे समाधी ॥ ४ ॥

निःशब्दता बघून सद्गुरू प्राप्त झाले।

निस्तब्ध बाळ बसला पण मान हाले ॥

आनंद रस लहरीवर चित्त नाचे।

व्यापार बाह्य तुटले जणुं बंधनांचे ॥ ५ ॥

ये सद्गुरू निकट ' ब्रूहि वरं' म्हणाया।

ठेऊनि हात शिरिं , जागृति दिव्य छाया ॥

डोक्यावरी क्षण फिरे गुरु यक्ष यष्टि।

दृष्टि खुले, चमकली बहिरंग सृष्टि ॥ ६ ॥

खालून भू निसटली अतिखोल जाया।

काळीज जाय जणुं काय तया पहाया ॥

डोळे असून उघडे न दिसे तयाला।

गाढांध लोकिं जणुं बाळ निमग्न झाला ॥ ७ ॥

होता फडाफड धडाधड कांहीं वेळ ।

चाले पुन्हां पठन पाठन रूप खेळ ॥

एवं प्रसाद गुरु देऊनि गुप्त होती ।

ते पाहती अडुनि सर्वहि पाठरीती ॥ ८ ॥

धोकंपट्टी स्वरूपें जणुं खळखळली वाङमयी स्वर्गगंङ्गा ॥

काळ्या मेघांमधेवा जणुं कडकडुनी वीज घालीत पिङ्गा ॥

मोठ्या धोंड्या मधेंवा सळसळ नदिचे वाहते शुद्ध पाणी ।

धोंडोशास्त्री पहाती गदगद दिसती ऐकुनी वेदवाणी ॥ ९ ॥

—-----

## बाहेर गांवी जायच्या वेळेस

काळजी घ्या तब्यती ची_आपली हो काळजीला दूर ठेवा ।

ठेवुनीमी येथ जाते सर्व माझा प्रेम ठेवा ॥

कष्ट ज्यानें फार होती तें तुम्हीं  हो सर्व सोडा ।

रोज नेमानें दुपारीं घेत जावा हो विसावा ॥ १ ॥

ह्या कपाटा आंत आहे लागलेलें लागते जें ।

वेलदोडे कीं लवंगा कीं सुपाऱ्या आणि मेवा ॥

येथं मोरांबा करूनी ठेविला मी आंवळयाचा ।

आण माझी! तो सकाळीं रोज तुम्हीं खात जावा ॥ २ ॥

पुस्तकें वेळीं अवेळीं वांचताजीं मध्यरात्रीं ।

कोण फेंकी त्यांस अतां !!! तीं मिटूनी वेळिं ठेवा ॥

मानसी ज्या राजहंसी कल्पना, त्यांच्या भराऱ्या थांबवाव्या ;

घ्या विसावा; रात्रि डोळा लागुं द्यावा ॥ ३ ॥

मित्रसंघाच्या भिडेला सोडुनी मोहांससाऱ्या ।

आग्रहाची ही विनंती वेळच्या वेळेस जेवा ।

सांगते मी हें कितीही जाणते ह्यांच्या स्वभावा ।

दाव यांना भाव माझ्या चित्तिंचे तूं देव देवा ॥

दोन ओळी दोन दा आठा दिसांनीं पाठवाव्या ।

त्यांत मी पाहीन कोठें प्राप्त होतो का विसावा ॥

कांही नाहीं हो तुम्हांला येतसें कैसे हंसें हें ॥

काय जाणे काय होतें जें मला ठाऊक देवा ! ॥

रे गड्यानों माणसांनों ! पाहुनी घ्या वस्तु माझ्या |

ज्या दिनीं येईन तेव्हां त्यापुढें मोजून ठेवा ॥

सर्व वस्तूहून मूल्यें श्रेष्ठ माझी वस्तु एथें ।

सर्व तुम्हीं नीट ठेवा नीट ठेवा नीट ठेवा ॥

—------

# पुन -र्मीलन

**(एक अकारण परित्यक्तेचें अकस्मात झालेलं पुनर्मीलन. चाल- अदयकाय हा माय आपल्या मुलां वरी - जाति तूण कव (यशोधन पान १८) चञ्चला मिश्र)**

कठिण काळ बाळ, आज आपणावरी असे

या घडीस द्यावयास

पाणि फक्त लोचनांत ओंजळींत घे कसे ॥ १ ॥

येथ सर्व देति त्रास

नाहिं कोणी आस पास

पाहुनि अम्हांस ज्यास (अ)से दय असा दिसे ॥२ ॥

त्यांतुनी कुणी द्रवून

पाणि द्यावया चुकून

हात तो पुढें करून पाणि वाढवी तरी हि नेत्र चुकवि कां असे !!! ॥३ ॥

अम्हां कडे पहावयास

यास हे जरी प्रयास

पाणि तें नको अम्हांस अशि तहान मुळिं नसे ॥ ४ ॥

त्या वचास ऐकतांच

लोचनांस फिरवितांच

युगल भाव बिंबताच भ्रूविलास होतसे ॥ ५ ॥

उभयलोचनांत वारि

सर्वताप तें निवारि

उभयतास खूण पटुनि हृदय हंसत एकसे ॥ ६ ॥

भूतलीन विस्मृतींत

वर्तमान जागृतींत गोड बाळ सें भविष्य, तें पुढें झुले हंसे ॥ ७ ॥

—------

# प्रार्थना

(श्री शारदेस)

उचल जननि उचल उचल घेई अंकिं लेंकरू

वासरास पाहतांच

दार प्रेम दाटतांच

झर झरावुनी लगेच लागतेच (/ग) पांझरू ॥ १ ॥

पंख जों नये फुटून

अंतरंग ये द्रवून

मुखांत जीवनांस घाल मी लहान पांखरु ॥ २ ॥

टाकितां नयेत पाय मी लहान नाहिं काय ?

असति शरण माय पाय उचल विकल  कोंकरू ॥ ३ ॥

भूक देत त्रास फार

सोड तूं मुखांत धार

अमृतपाज हृदयशांत भावनेंत दे विरु ॥ ४ ॥

आंत हृदयिं होत काय ।

सांगतां न येत माय ॥

बोलवेन सांगवेन सांग काय मी करू ॥ ५ ॥

करूनि लोचनास लाल

लोक पाहतात बाल

मन शरीर भाजतां च , लाग माय गोंजरू ॥ ६ ॥

लिहव हात तूं धरून

उठव भाव उमळवून

हृदय जाउं दे भरून मृदुलगीत करिं सुरुं ॥ ७ ॥

गाच प्रेमगीत माय ।

हृदयिं मम तुझ्या न, माय ।

थापडून मस्तकास दे समाधि तूं स्फुरुं ॥ ८ ॥

—----

## श्री शारदेचा आशीर्वाद

काढ बाळ, काढ  रेघ हृदय रंगभूवरी ।

चित्रकार तूं नवीन

लेखनी कलाविहीन

इंद्र चापकान्ति रेघ काढशील कधिं तरी ॥ १ ॥

व्यर्थ रंग नासशील

व्यर्थ बाळ भागशील

काय चित्र काढशील ! काढ रेघ तूं बरी ॥ २ ॥

धड न रेघ ये अजून

वळव वळव ती लवून

वळण लागण्यास बाळ .वेळ लागतो परी ॥ ३ ॥

वेडि वाकडीच काढ

बारकी तशीच जाड

डोळसां दिसेल त्यांत बाळ भाव अंतरीं ॥ ४ ॥

अक्षरांत रेघ तीच

वर्तुळांत ती तशीच

नांव भिन्न पावतांच वाच्यरूप ती धरी ॥ ५ ॥

कशा कशा मधून जात

नीट बैस तूं पहात

तीच रेघ आकृतींत चित्र होतसे खरी ॥ ६ ॥

रम्य वळण रेघ घेत

दृश्य भिन्न हृदयिं येत

त्वन्निमित्त चित्र मीच रंगवीन अक्षरी ॥ ७ ॥

हात धरून  काढवीन

शुद्ध भाव वाढवीन

रंगवीन वैखरीस वरद हस्त हा शिरीं ॥ ८ ॥

—-----

## भू - वैकुण्ठ

थांबू येथ नकोस तूं पळभरी येथून आतां पळ ।

राही दूर तिथून बोल; न मला लागो तुझी ही झळ ॥

सांगे कोण सुदिव्य नेत्र महिमा पाषाण ही पाझरे ।

मोठ्या संयम बंधनांत फुटती प्रेमामृताचे झरे ॥

किंवा त्वन्मुख चंद्र रम्य किरणें संतापये ! घालवूं !

येथें ये , बस; चन्द्रकान्त हृदयीं लागे अतां हा द्रवूं ॥

जाऊं दे सुशिला न विन्मुख कधीं अभ्यागता माणसा ।

आतिथ्या समयोचिता करि अतां संतृप्त मन्मानसा ॥

हा संसार अफाट सागर असे नाना इथें यातना ।

येथें या तरुणी अहा ! तरणिशा उल्हासवाया मना ॥

ताराया बुडत्यांस कुंभ कुंच हे तुंबे पयोधींतले ।

देती दिव्य धडे अनेक शिकण्या संसारनीतींतले ॥

झाऱ्यांनीं पय अर्पुनी शिशु मुखीं उद्यान ते निर्मिती

जेव्हां ते नवयौवनांत डुलती वैकुण्ठ ये खालती ॥

—-----

## काव्य मंदिर

' आहे सुन्दर काव्यमंदिर तुझे प्रासाद कीं दिव्य हा ।

आहे गोड समस्त पद रचना भव्या अपूर्वा पहा ॥

सानुस्वारन सुवर्ण किङ्किणि रवें नादें घुमे घुम्मट ।

नाहीं ग्राम्यपद प्रयोग अथवा भाषा जसे उर्मट ॥

नाना मौक्तिक शब्द जाल झुळती सारे झुलूं लागती '

आरंभी बहिरंग पाहुनि मना वाटे बरें रे किती ! ॥

जांतां सत्वर अंतरंग बघण्या सोत्कण्ठ चित्तें पुढें ।

अशा भव्य जणूं अम्हा फसवुनी ने आंत कोणी कडे ! ॥

काव्यात्मा रस शून्य मंदिर तुझे येथें बसावें कसे ।

आहे मंदिर कीं मशीद समजूं येथें न मूर्ती असे ।

खोलीची अजुनी तुम्हां न कळलीं खोली;पहाया पुढें ! ॥

येथें उंबरठा; तिथून बघतां यावे पहावें पुढें ! ॥

ठेवांवीं उघडी तुम्हीं स्वनयनें आंत या मन्दिरीं

काव्यात्मा सुविराजमान भगवान् केन्द्रांन्तरीं अन्तरीं ॥

—-------

# आत्मवंचन

भाषासौष्ठव अर्थपूर्ण रचना अत्यन्त प्रासादिकी ।

वाणी छंद रसाळ गोड यमकें पाहून प्रासादि की ॥

वारे ह्या अवांबरांत दिपुनी जातील कीं सन्मती ।

मोठ्याने स्वयमेव गौरव वचें गातील माझी कृती ॥ १ ॥

ज्ञातांना पुसतां निषेध वचनीं त्यांची हले मान ती ।

" आहे हा तव पोर खेळ"; कवनें कोणी न सम्मानिती ॥

नाहीं सत्कवि तूं अजून, न जसा ब्रम्हर्षि तो कौशिक ।

पारी घे करिं; काव्य गुंफन घडे बाळा, नवे घे शिक ॥ २ ॥

एवं सत्कविचा नितान्त फुटला हा भ्रान्ति चा भोंपळा ।

जाई मन्मद हा गळून सगळा झालों मनीं हावळा ॥

वाटे काय करुं हळूच बसण्या सम्मानिका पंक्तिला ।

संसारातिल चित्रता विविधता नैराश्य देई मला ॥ ३ ॥

दृष्टि रोंखुनि भिन्न भिन्न विषयीं डोळे पुढें लावलें ।

वाटे कांहि स्फुरे नवीन पडदे चित्तीं खुलूं लागले ॥

लागे सत्वविहीन वस्तुहि निजे तेजें प्रकाशावया ।

अर्पाया बहिरंतरंग नवता चित्तास तपविया ॥ ४ ॥

संचारा मनही निगूढ स्थळिं ही लागे कराया पुढें ।

जेथें स्थूल दिसे न; सूक्ष्म वळलें अत्यन्तसूक्ष्मा कडे ॥

जाती प्राकृत बंधनातुनि मनोव्यापार एवं असे ।

आनन्दातिशयांत दृष्टि रमली सारें निराळें दिसे ॥ ५ ॥

जेव्हां दृष्टी निराळी विकसुनि अशिही लागली अंतराळीं ।

त्या काळीं रम्य झालीं सकल शुभद दृश्यें पूर्विं जी पूर्णकाळीं ॥

अंतर्ध्याना करीं मी क्षणनिमिलित नेत्रें अंतरीं पाहुं लागे ।

होते जे झोंपलेले चिरमृदु सगळे भावते होति जागे ॥ ६ ॥

—-------

## एक गोड स्मृति

घ्या घ्या दूध; नको नको ! सरळ तूं ऐकायला कोठली ! ।

पेल्याचा मग कांठ तो जबरिनें ओठांस तूं लाविशी ॥

खालीं पाहुनि मी लिहीत म्हटलें' पीणार नाहींच जा ! 1 .

खालीं अम्मल तूं लवून बघतां पेला रिकामा असे ।

माझा हट्ट तुझ्या पुढें कधिं तरी चालेल का वाटते ? ।

दृष्टिक्षेप नवीन, शोधिशि नव्या रात्रंदिनीं तूं तर्हा ॥

नाना - संयम - योजना करितसे मी आपल्या मानसीं ।

येतां दृष्टिस तूं सदा विरमती त्या जागच्या जागिं कीं ।
माहेरीं जरि जाशि तूं कधिं तरी बाहेर किंवा कुठें ग
आहे सर्व सुखें; तुझ्याविण तरी निर्भेल ना वाटती ॥
वाटे त्यांत चुके कुठें तरि खरी चित्तास आनन्दनी ।
येतां सौख्य खनी घरीं प्रगटती दुःखें सुखें होउनी ॥
'कान्तारादतिरिच्यते घर' असे कान्तेचियावाचुनी ।
याची सार्थकता नितान्त पटतां उद्विग्नता ये मनीं ॥
—------

## बुद्धि - प्रदीप

**(निरीक्षण शक्ति संपन्न व परिश्रमी कवित्व भावने शिवाय प्रत्येक वस्तूंतलें अंतरंग सौंदर्य कळणार नाहीं व त्याशिवाय सुन्दर काव्य निर्माण होणें शक्य नाहीं)**

लाव लाव नीट लाव बालकां दिवा अतां ।

पाहि नीट तेल वात आंत

घालि तेल लोचनांत

वेळि काजळीस झाड घेई काळजी स्वतां ॥ १ ॥

~~वायु वाढवीत ज्योत~~

~~उंच उंच जाळ होत~~

~~जात गगन मंडळांत , इंधनास पावतां ॥ २ ॥~~

~~दिवा परन्तु हा लहान~~

पाहि नीट वायु - मान

हात लाव दार लाव सार त्यांस तूं स्वतां ॥ ३ ॥

दीप छान पाजळेल

तिमिर सर्वही जळेल

जें हवें पुढें कळेल ध्यान नीट लावतां ॥ ४ ॥

(प्राण) वात संयमांत मन ।

ज्योतिराहते समान ॥

दिसेल सर्व वस्तुमान अचल दृष्टि राहतां ॥ ५ ॥

वस्तु जात वैभवास

सूक्ष्म रम्य भावनास

दीपज्योति जागवीत सावकाश तेवतां ॥ ६ ॥

सर्ववस्तु अंतरंग

रम्य रूप जें अभंग

काव्य भावनेंत दंग बुद्धि होत पाहतां ॥ ७ ॥

—------

# लहान मुलींची परीक्षा

नाहीं येथ तळें; तरी कुणि तरी लोटींत पाणी भरी।

नाहीं येथ कढी; परन्तु भुरके मारीत कोणी तरी॥

कोणाची जणुं बुद्धि ये गळत ही नाकांत वाटे वरी।

झेलूनी वरच्यावरी श्वसन कीं डोक्यांत लोटी वरी॥ १॥

नाका मध्यें अडकवि कुणी सुंकलें एक श्यामा।

चांदीच्या त्यावर चढविते सारखा ती मुलामा॥

दोन्ही बाजू वदन करूनी वांकडे पाळि पाळिं।

त्वेषें ओढी वर अपलि ती नासिका योग्य काळीं॥ २॥

वाजे कोठें हळु हळु कधीं कुन्द नाकांत वंशी।

सूं सूं सूं सूं ध्वनि सतत तो ऐकुं ये कांहिं अंशीं॥

कोठें ओठा वरति फिरती बालिकांच्या जिभा त्या।

कोठें माना हलति किति कां ? हें पुसावें विधात्या॥ ३॥

वाटे कोणा निसटुनि कुठें लेखनी काय जाते।

बोटा मध्यें म्हणुनि धरिती दाबुनी मुस्कुटातें॥

एवं न्युब्जाङ्गुलिंत धरिती घट्ट खालीं निबाला।

लेखापूर्वी मग पुटपुटे कांहिं प्रत्येक बाला ॥ ४ ॥

एका मेका कड कडुनिकीं अक्षरें भेंट घेती ।

ओळी वाटा जणुं त्यजुनि तीं फांकडीं वक्र जाती ॥

भांडाभांडी करिति भिडवी कोणि मांडीस मांडी ।

देती ओळी कधिं कधिं कुठें एकमेका गचांडी ॥ ५ ॥

ठप् ठप् ठप् हा ध्वनिं मज किती वेळ तो ऐकुं आला .

कोणी बाला निज कर तळें थापटी लेखमाला ॥

ब्लॉटिंग ने कळलें ओंगळ्या ओघळाला ।

धाडायला करूनि अपल्या नेटक्या उत्तराला ॥ ६ ॥

अर्ध्याहूनी अधिक भरलीं बालिका बाल बोटें ।

अर्ध्याहूनी अधिक जाणि च्या लागलीं गाल बोटें ॥

कोठें ओठावरति खुलती बिंदुही नीलवर्णी ॥ ७ ॥

' धांवा धांवा' म्हणुनि म्हणती नेत्र एका मुलीचे ।

दृष्टी रम्या चकित हरिणी सारखे भाव तीचे ॥

भित्री बाला किति तरि दिसे कावरी बावरी ती ।

गेलो तीच्या जवळिं दिसली पाहिली मी फजीती ॥ ८ ॥

झाली दैना पडत उलथी पालथी दौत खालीं ।

गेली शाई लवंडुन अधोविन्मुखी दौत झाली ॥

दौतीचा कीं करित अधरस्पर्श तो अङ्कभूचा ।

धांवा लागे म्हणुनि म्हणण्या बाळ भित्री प्रभूचा ॥ ९ ॥

—-------

# आवड

(जाति - वारुणी)

कोणि मर्मा पाहण्याला कोणि वर्मा काढण्याला ।

कोणि येती हो कशाला कोणि येती हो कशाला ॥

कोणि प्रेमें रूप पाही कोणि काढी कुस्पटांना ।

कोणि येती दर्शनाला कोणि तोंडें पाहण्याला ॥

खोल राही आंत मोती फार खालीं शिंपल्यांत ।

कोणि न्याया त्यास येती कोणि गाढा न्यावयाला ॥

तोंड काळें कीं करूनी कोणि काढी कोळशाला ।

कोणि काढी कोळशाच्या खाणिंतूनी ही हिऱ्याला ॥

कोणि फांद्या कोंवळ्याही मोडुनी तोडी फुलाला ।

कोणि काटे वाचवूनी नेमकें घेई तयाला ॥

कोणि रत्ना फोडुनी ही पाहती भावान्तरंग ।

रामभावावीण भक्ता तुच्छ कोणा काव्य माला ॥

(पाहण्याला राम, रत्ना फोडी रामभक्त)

—--------

# एका मित्रास किंवा -

टाळे देशि किती ! मितीवर मिती जाती; नसे ज्या मिती ।
रात्रीं या दिवसा उद्यांच परवा; पर्वा न वाटे तुला ॥
गेला आठवडा; न आठवण ती, होतें कसें से मला ।
भोळें मन्मन हें निरन्तर तरी वाखाणतें त्वन्मती ॥
पंध्राव्या दिवशीं अवश्य, महिने जाती किती त्या वरी ।
चित्तीं मी झुरतो परन्तु झुलवी आशा मला ही पुन्हां ॥
स्वप्नें गोड पुन्हां मला फंसवती; मी काय केला गुन्हां ? ।
येशि भेट न देशि तूं; फिरविशी बोळा करारावरी !! ॥
ये ! ये! देइन मी धडे तुज असे ज्यानें न हो विस्मृती ।
ये! ये ! ये ! पण एकदां कधिं तरी; संकोच सोडी अतां ॥
अत्युत्कण्ठ करील दृष्टि सजला प्रेमें तुझ्या स्वागता ।
प्रेमाचे रसयुक्त शब्द रसना अर्पील भावे अती ॥
झालें आजवरी ! पुढें विसरुं ये ! जें जाहलें जाहलें ।
घेवो जीवन रम्य नव वळणा होवो तुझें चांगले ॥

—------

## वरची चमक

आहे  हें हंसणें मना फंसुं नको जाळें तुला फासण्या ।

काळी अंतरिं रात्र ही हंसतसे, नक्षत्र रुपें वरी ॥

काळे अंतरिं काळकूट भरलें पीयूष ओंठावरी ।

आहे हें स्मित - भाव सुन्दर मुखीं काळे मुखा फांसण्या ॥

सौख्य -स्वप्न खरे नसे; व असुं दे विश्वास स्वप्नावरी ।

किंवा ही मृगतृष्णिका वळविते चित्तास तुझ्या अता ॥

येथे केवळ वाळवंट चमके जेथें न प्रेमार्द्रता ।

चारी बाजुस नीट तूं चल पुढें पाहून खालीं वरी ॥

अत्यन्तोज्वल दीप्ति दिव्य दिपवी कोणानं प्राण्यास ती ।

तेथें दृष्टि खिले  सुसंयत तिथें सच्चित्त ही चावळे ॥

तेथें काय कथा तुझी ! जगत हें होते जिथें बावळे ।

जाती पंख पतंगसे जळुनि हे खुंटेल तूझी गती ॥

भाळू येथ नकोस तूं वरीवरी पाहून हें चांदणें ।

संतापानल आंत येथ लपला प्रच्छन्न सा पाहणें ॥

—------

# दोन अश्रु

(अश्रु - १)

गगनीं कुणि घोर घातकी।

घिरट्या घालुन घार निर्घृण॥

जशि लोचन तीव्र रोंखुनी।

उचली घास अचूक आपला॥ १ ॥

अथवा यम गृध्रराज सा।

बसला उंच टपून सारखा॥

लपवून किती हि ठेविला।

उचली खालुन पिण्ड नेमका॥ २ ॥

चुकवीनर कोणता जगीं।

जननानन्तर मृत्युयोजना॥

नियमांत निसर्ग चालवी।

सगळी सृष्टि चतुर्विधा तशी॥ ३ ॥

मग वीज अकालिं कां अशी।

पडली ही विकराळ काळशी !॥

फुलला नुकतांच जो तरु।

पडला छिन्न विछिन्न (विभिन्न) होउनी ॥ ४ ॥

मरण्यास कितीक इच्छिती ।

पिकलेलीं अतिवृद्ध माणसें ॥

वगळूण अचूक त्यांस, तो ।

उचली निर्दय घांस कोंवळा ॥५ ॥

धरणीवर बांस टेंकुनी ।

उडती उंच किती तरी वरी ॥

पण नूतन 'पोल- जम्प ' हा ।

वर जाशी नच येशि भूवरी ॥ ६ ॥

हृदयंगम ते विहंगम ।

बसती बाम्बु समाश्रयावर ॥

भरुनी तरु मञ्जु कूजनें ॥

मग येती खग खालती पुन्हां ॥ ७ ॥

वरच्यावर जाशि तूं पण ।

चढुनी नूतन बाम्बु वाहनीं ॥

दिसते किति हो लहानशी ।

पण नेते किति उंच ही शिडी ॥ ८ ॥

चिमण्या तव तीन दीन शा।

करिती च्यूं चिंव सारख्या इथें॥

घरट्यांत भिरीभिरी तुझ्या।

घिरट्या घालिति पांखरा कशा !!! ॥ ९ ॥

पुसती जननीस' तूं कुठें।

पुसुनी कुंकु विलीन जाहला' ॥

उडतां तव पक्ष वायु नें।

पुसलेंजें पुसतां नये कुणा ॥ १० ॥

शर से मृदु शब्द झोंबती।

हृदयीं बांध फुटून वाहती॥

करुणारव ऐकुनी सख्या।

परतूनी तरि येशि का अता ? ॥ ११ ॥

कुल तारक बाल तारका '

दुहिता दोन लहान ह्या किती॥

करि लालन पालना अता।

तुजवांचून तदीय कोण रे ! ॥ १२ ॥

दुरुनी तुज पाहतां किती।

हंसती सुन्दर प्रेममूर्ति त्या |

घुडघा विळख्यास घालण्या

बसण्या अङ्क न का अता मिळे ॥ १३ ॥

हळु आडुन पाहण्यास हें ।

न च ये दृश्य कुणास का पुढें ॥

नयनें नच लागतीलका !! 1

घरिं येण्यास पथा कडे अंतां ॥ १४ ॥

हृदयांतिल प्रेम प्रेरणा ।

सगळ्या त्वन्मय भाव भावना ॥

जिरतीलमनांतल्या मनीं ।

सगळे प्रेम प्रवाह का अतां ॥ १५ ॥

—----

## दोन अश्रु

(२)

हंसणे तव चालणें तसें ।

अथवा मार्मिक बोलणें तुझें ॥

सगळे व्यवहार वागणें ॥

सरलावृत्तिंत जन्म पावले॥ १ ॥

अतिप्रेमळ भावना तुझ्या ।

सगळया कोमन युक्ति योजना ॥

दुखवीति कधीं कुणा न त्या ।

फुलवीती हृदयांतल्या कळया॥ २ ॥

किति ही ढग व्यापिती जरी ।

करिशी उज्ज्वल मित्रमण्डला ॥

जणुं अद्भुत तेज केन्द्र तूं ।

फिरविशी नव सर्चलाइट ॥ ३ ॥

हृदयांतिल गुप्त कोपरा ।

उजळे निर्मल नित्य भोंवती ॥

घटली सगळी अतां प्रभा ।

हृदयें निष्प्रभ होत चाललीं ॥ ४ ॥

दिन नाथ ! दिनावसानिं या ।

करूनी दीन वसुंधरा प्रिया ॥

करूनी कर संचयास तूं ।

लय आत्यन्तिक पावसी अतां ॥ ५ ॥

वदनें बघ काळवंडलीं ।

रजनी दार मनांत दाटली ॥

स्मृतिची पण तारका तुझ्या ।

तिमिराब्धींत अम्हास तारका ॥ ६ ॥

मधुनी स्फुरूनी कधी कधी ।

नव चैतन्य अम्हास अर्पिल ॥

अतिसूक्ष्म धरून रूप तूं ।

अमच्या मानसिं राहशील कीं ॥ ७ ॥

वचनामृत सांठवन तूं ।

हृदयाच्या कलशांत आमच्या ॥

विलयास सुहास्य विनोद मूर्ति तूं ।

हसणे घेउनि जाशि आमचे ॥ ८ ॥

नभिं तारक लीन होतसे ॥

हृदयीं लेख लिहून तैजस ॥

नररत्न विलीन जाहला ।

करूनी सार्थ वसुंधरा धरा ॥ ९ ॥

# विहार

आहे पुष्पित कुंज पुंजित इथें नक्षत्र कीं तारका।

स्नाना येति ऋषि मुनी सकलही येथें महन्मालिका॥

स्वर्गांतील सुगंधिवायु पसरी गंगाजलाच्या कणा।

आनन्दें डुलवीत तो भुलविते संतप्तशात्वन्मना॥

मारायास बुडी असे नवशिक्या स्वर्गीय गङ्गान्तरीं।

आहे जी रमणीय कीं पसरली दिव्यांबरा भीतरी॥

प्रेमाब्धींतिल ह्या पयोधरतटा आधार सम्मानुन।

स्नाना येथ खुशाल तूं कर इथें आनन्द-आलोडन॥

ज्याचे खांब नितंब जानु हृदयप्रेमाश्रयें लोंबतो।

आहे दिव्य झुला सदा झुलवितो सोत्कण्ठ चित्तास तो॥

शृंगारांतिल रम्यनीति नियमें तो बंधनीं हालतो।

झोंके येति नवीन गोड हलतां सानन्द झोंकांत तो॥

गाती नाचति आश्रयीं हृदयिं च्या सद्भावना कोकिला।

प्रेमाब्धीं तिल गुद्गुल्या बुडबुडे झोक्यांत होवो तुला॥

—------

# शोध

पाठी वरी पडुनि धुंडत बाळ कांहीं।

पाही; परन्तु निज वांछित वस्तु नाहीं॥

(जे पाहिजे तिज दिसे परन्तु तिथें न पाही)

तोंडास वत्स फिरवी कुरणीं चराया।

(तैशीच तोंड फिरवी तनया हि प्याया।)

तैशीच - चांचपडते शिशु - घास घ्याया॥ १॥

झोंपते गाढ जननी; तरि बाल लीला।

वाटे अलंकृत स्मितें करिते कपोला॥

व्यापार- बाह्य थकले जरि इंद्रियांचे।

सामर्थ्य आंत प्रगट तरि सूक्ष्म त्यांचे॥ २॥

आईस पूर्ण सविकल्प समाधि लागे।

आत्मस्वरूप शिशु - ज्योतिस पाहुं लागे॥

उद्भूत हा स्मित - तरङ्ग सुधाकराचा।

होताच स्पर्श शिशुच्या अधरा करा चा॥ ३॥

शोभे कलानिधि कला द्वितिये परीजे।

माता मुखीं स्मित कला खुलते विराजे॥

वात्सल्य - मन्दिर मन स्मित वैजयन्ती।

जी हालतां पळतसे सगळी अशान्ति॥ ४॥

किंवा मुखांतिल झुळुक तरङ्ग आणी।

किंवा मनिं अमृत ओतत बाल वाणी॥

पुष्पापरी मृदुल मानस हालुं लागे।

होती अहा ! सकल कोमल भाव जागे॥ ५॥

प्रेमाब्धि च्या उसळती मनिं प्रेम लाटा।

वाटे मनीं मज मिळो तरि अल्प वाटा ! ॥

वाटा निरुद्ध हृदयान्तरिं जावयाला।

त्याचा न थांग हि कळेल पहावयाला॥ ६॥

लागे शिशु हुडकण्या अति पाठ पोट।

पाहीत जणूं लिखित सर्वहि पाठ पोट॥

थांबे जिथें अडखळें जणुं वाचतांना।

होई प्रसन्न मग अक्षर लागतांना॥ ७॥

काढून आवरण ती मिळवी निगूढा।

तेथेंच ती रमत बाळ नितान्त मूढा॥

सोत्कण्ठती चिकटली; ढकला न जाई।

वाटे जणूं मिळत ब्रम्ह मुलीस आई॥ ८॥

कीं दाबतां बटन लक्ख प्रकाश होई ।

अंतर्जगांतुनि बहिर्जगिं येइ आई ॥

पाही समोर हंसली' अग बाई !' बोले ।

कोणी हि ऐकुनि पिता हृदयज्ञ डोले ॥ ९ ॥

ती सारखे नयन लावित; पाहिलें मी ।

ती वासरास बुडवीत बुडून प्रेमीं ॥

पाठीवरून फिरवी कर पल्लवाला।

बालेस ये स्फुरण पान करावयाला ॥ १० ॥

दृष्टींत प्रेम भरलें किति प्रेमलेच्या ।

येथें कला विकसल्या सगळया कलांच्या ॥

जेव्हां बळे मज कडे जननी तिची ती ।

सांगेल कोण अवलोकन भावरीती ॥ ११ ॥

—---------

# पत्र

पत्र आलें- ' येतसे मी शुक्रवाराच्या दुपारीं ।

स्टेशनीं या घ्यावया कामें करूनी दूर सारीं ॥

रात्रिं गाडीनें निघूनी येउं सारे हो उपाशी ।

जेवण्यांची बालकांच्या राहुंध्या सारी तयारी ॥'

मोर नाचे चित्तिं माझ्या बोलुं लागे कीर (प्रेम) वाणी ।

पारवा ' हूं ! हूं ! ' म्हणे हो खोल माझ्या हृकपाळीं ॥

गोड आज्ञा मस्तकीं मी वंद्य मानी; माणसाला ।

लाव सांगे वेळिं टांगे स्वामिनीची, येत स्वारी ॥

कोपऱ्याच्या ह्या घराच्या झालरी काढून जाळीं ।

स्वच्छता बाहेर ठेवा आंत आवारांत दारीं ॥

चादरी काढून काळ्या फक्क लावा पांढऱ्या त्या l

शुभ्र अभ्रे आंत आण्ते चांदणें कीं शीतकारी ॥

मागवूनी आइसाला क्रीम सोडा-वॉटराला ।

टेबलाला भूषवूं द्या धर्मबिन्दु श्रान्तिहारी ॥

पुष्प झेले रम्य येथें पुष्पपात्रीं फुल्ल ठेवा ।

श्रान्तचित्त स्वागतानें हांसवो हीं हांसणारी ॥

झाली सारी ही व्यवस्था मंदिराची ही सफाई ।

देवतेला आणण्याला चालुंद्याही फौज सारी ॥

ट्रेन येण्यास घांट झाली धूर दाटे दाट दूर ।

शीळ झाली गाडि आली । प्लॅटफॉर्मां गर्दि भारी ॥

लागती पाहावयाला कोणि कोणा कोणि कोणा ।

जेथे ज्याचे आवडीचे तेथ लागे दृष्टि सारी ॥

तोरणें डोळ्यावरीचीं लागलीं नाचावयाला ।

मङ्गलाच्या भूपताका हालती माङ्गल्यकारी ॥

दृष्टि गाई गोडगीतें एकमेका स्वागतांचीं ।

लोचनांच्या पेटिकांच्या आंत मुक्ता बिन्दुवारी ॥

होत दृष्टादृष्ट जेव्हां दृष्टि काढी दृष्ट माझी ।

सृष्टि झाली मग्न सारी' वृष्टि होतां प्रेमधारीं ॥

दाड् द् दा दाई दु बाळ गाई ताल देई ती करांनीं ।

चंद्रिके च्या ह्या कलांनीं दृष्टि झाली तर्र सारी ॥

शुक्रवारीं शुक्रतारा स्टेशनीं पाही दुपारीं ।

ऊन होते प्लॅटफार्मीं हें कळे आदित्यवारीं ॥

जंगलीं ही बंगल्या च्याआंत लीला मङ्गलाच्या ।

मङ्गला पाङ्गातरङ्गीं रंगली मद्वृत्ती सारी॥

धन्य वाटे ही वियोगाची अमावस्या मनाला ।

आज (राम) चंद्रा ची प्रभाही चंद्रिका फांके फुलोरी ॥

—---

## विश्रान्ति

जाई जाई रे !

विहगा जा! । दमला थकला बाबा । जाई घरट्यांत ॥

फिरलासी। फिरणे फिरणे थकलासी । जाई घरट्यात ।।१।।जाई जाई रे ।

पिल्लें तीं। चिंव चिंव चिंव चिंव करिती । अपल्या घरट्यांत ।

वाट कशी। बघती, केव्हां येशी । अपल्या घरट्यांत ।।२।। जाई जाई रे ।

त्यां देई ।मिळविशी जें तें घेई झालीं व्याकुळतीं ।।

ढग काळे । पसरति नभिं बघ सगळे । करितों काकुळती ।।३।। जाई जाई रे ।

बघ रवि तो ।पळ पळ पळ पळ पळतो ।गमवि न पळ वाया ।।

दिग्ललना। सांगति त्या शुभवदना। 'श्रमाविशि कां काया! '।।४।। जाई जाई रे।

सोड फळें। सोडुनि फिरणें सगळें।  फिर तूं माघारा।।

गोड झरा। झरझर वाहिल सारा।  परतुनि जाच घरा।।५ ॥ जाई जाई रे ।

पी पाणी । कल कल कल रस  वाणी।  प्रेमें भरलेली ।।

गुजगोष्टी । करूनी, मिळवी तुष्टी।  तनु तव थकलेली ॥ ६ ॥ जाई जाई रे ।।

उरलेली।रात्र घालवी सगळी ।  आपल्या घरट्यांत।।

विश्रांती।  खरी खरी तुज अन्तीं । आपल्या घरट्यांत।।७।।  जाई जाई रे ।

—-----

## कुन्द - कलिका

**(अगदी लहान मुलाच्या दाताच्या मध्यें एक लहान सा दांत आलेला पाहून आई आपल्या मुलींला म्हणते)**

बोलुं नको ग सोनुकली ला ।

मोहवि मोहक बालक - लीला ॥ ध्रु ० ॥

अधर पल्लवान्तरिं ज्या लपती ।

सर्वहि निर्मल कलिका दिसती ॥

कुन्द - कळ्या  ह्या काय विकसती !

बघ बघ बघ ह्या बाल - कलीला ॥ १ ॥

गगन तारका मुखिं कीं लपती

इवली शी जणुं ही काय अरुंधती

चम चम चमके कशिं बघ बघ ती

लागेलच कीं दृष्टच इजला ॥ २ ॥

—------

## कशास आली चिमणे ! -

कशास आली चिमणे ! होती बरी घरीं अपल्या तेथें ।

उडुनि कशि गे भुर्रच गेली सोडुनि मज आता येथें ॥ १ ॥

' नको! नको!', तुज किति तरि म्हटलें पडली तूं कां मम चरणीं!

मज वाटे नभ फाटे आतां दुभंगते पण न च धरणी ॥ २ ॥

जिवंत मरणें जगणें जेथें तेथुन येथें तुज अणलें ।

गमले टळले उपास मरण न कळलें संकट ओढवलें ॥ ३ ॥

मोठ्याचें घर मोठें म्हणुनी धरुनि आस आलो मोठी ।

गमवुन बसलो सगळें येथें ! वणवण ही पोटासाठीं ॥ ४ ॥

दिसावयाला नन्दनवनशी फुलली बाग कशी दिसली ।

जणुं हा भपका वरवर चमकत वर वर जशि घातुक बिजली ॥ ५ ॥

येथें रक्षक इतके असुनी नजर चुकवुनी यम आला !

मज गरिबावर कुठुन ! कसा! कां! अवचित घाली हा घाला ॥ ६ ॥

आभाळ माझ्यावरी पडो हें बरें तरी हो कोसळुनी ! 1

जिवंत मी तरु तरि कशि पडली कोमल  वेली उन्मळुनी ॥ ७ ॥

घशांत घर घर होतां तुज जणुं ' घरा ! घरा !' कीं गे आठवले ! ॥

जिथें अमृत जणुं निघुन जलधिं तुन हृदय कलशिं की सांठवले ॥ ८ ॥

जननी समजत असेल असशील गोड घास खात सुखांत ।

क्रूर काळ करि गोड घास तव नसेल पण हें तिच्या मनांत ॥ ९ ॥

घरटा लागे; घटके माजी मैना गेली घरट्यांत ।

पिंजरा पडला नुसतां येथें फिक्कट सुंदर दिसण्यांत ॥ १० ॥

मनोहारिणी गेली हृदय तरली करणी मम हरणी ।

कुणाचि करुं मी कोण करिल वा ? आता माझी लवकर मनधरणी ॥ ११ ॥

बघुनि हें मग प्रभा वदे मज अपल्या हृदयांतिल भावा 1

' दादा! हा घरिं जाइल तेव्हां कसं होइल बहिणी भावा! ॥ १२ ॥

म्हणेल आई हिची काय हो रडेल नाहीं बरें बरेंच ! ॥

उर बडवुनि  तो म्हणते ' न कळुनि म्हणशि बाळे खरें खरेंच ॥ १३ ॥

—---

# बाई - राजा

**(एका १-१/२ वर्षाच्या मुलीचा आजा वारल्या नन्तर दुसऱ्या दिवशीं सकाळ होतां क्षणीं नेहमींची हांक कानावर न आल्यानें त्या मुग्ध बालिकेच्या क्षुब्ध झालेल्या मन:स्थिती चें चित्र ह्यांत वर्णिले आहे)**

मुळिं न बोलतां बाला बोले पदर ओढुनी बोल मुके ।

चल गे ! घेउनि बाबा जवळी पटा पटा घेति मुके ॥ १ ॥

कडेवर घेउनि सकाळ होतां ते फिरती इकडे तिकडे ।

प्रेमें नेमें करिती ते गे ! चल चल अस तिल ते जिकडे ॥ २ ॥

बाबा उठले अजुनी नचपण मी उठले त्यांच्या पहिले ।

उजाडले तरि घोरत निजले । दिसले मज पहिले पहिले ॥ ३ ॥

उठुनि म्हणति दररोज आज पण ऐकुं नये कशी 'प्रभाती' ।

' शशि की ज्योत मन्द भई' म्हणती गीत रोज हेंच प्रभाती ॥ ४ ॥

मन्द तेज शशि गेला सोडुनि कुमुद वनाला गगनाला ।

बाबा उठले कसे तरि न पवि - ताप होत किति वर आला ! ॥ ५ ॥

बाबा होते इथेंच निजले मज म्हणती बाई राजा ।

घरांतला घरचा हा माझ्या हृदयीं चा कलिजा राजा ॥ ६ ॥

इथें न दिसती बाबा का ग ! दिसे न कां कुठे बिछाना ॥

कितिंदा पुसती ' उठले मी कां ?' उठतां म्हणती ' ये  मैना' ॥ ७ ॥

काय कुठें ते गेले ! किंवा कीं घर निजण्याचे काय बदलले।
पदर ओढुनी चल जणुं म्हणत्ये कळे न तिज दैव बदलले ॥ ८ ॥
पुन्हां म्हणे जणुं दुपार झाली मंमं ची ही वेळ तरी।
वाढे तळमळ मनांत नच ये दुपारची पण हांक खरी ॥ ९ ॥
फिरुनी फिरुनी रडकुंडीला ती आली कोमल बाला !
नाइं नाइं म्हणुनि मुखें मग हलवि खालिं वर हाताला ॥ १० ॥
हृदय ताप जणुं शमण्या हलवी तालाचा करतल  पंखा।
हृदय आर्द्र उडुं  धड धडुं लागे फडफडवी चिमणी पंखा ॥ ११ ॥
सुंदर पुस्तक मूल असें हें मुकें असोवा वाचाल।
मुखपृष्ठा वरि काय तुम्ही किति अंतरिंचे तरि वाचाल ॥ १२ ॥
मुक्या जिवाच्या हृदय हृदान्तरिं खोल खोल किति तरि जावें।
बुडी मारूनी दडी देउनी मुग्ध होउनी बैसावे ॥ १३ ॥
—-----

# माझें लग्न

(बाह्य जगांत आंतरिक भावनेला आणि कल्पनेला अनुकूल पत्नी मिळाल्यां वाचून खरें दांपत्यिक प्रेम असूं शकत नाही)

वांटे मनांतुन मला मम लग्न व्हावें।

पहावयास मज ये कुणि का पहावें ! ॥

प्रारब्धयोग जुळला बघण्या अनन्त।

आले, परन्तु करिती, मज नापसंत !!! ॥ १ ॥

कांट्यांत संसृप्ति पथांत असा का मी।

मार्गक्रमीनं अति खिन्न सहाय-कामी !! ॥

कान्तार काय मम होइल भव्य वाडा !।

दैवे दिला समजुं अंतिम का निवाडा!! ॥ २ ॥

चालेल काय रथ हा मम एक चक्री !।

ठेवील दृष्टि शनि सतत काय वक्री !! ॥

का चंद्रिका विकसवील न चित्त - कुञ्जा !।

आजन्म मी सतत राहीन काय मुंजा ! ॥ ३ ॥

दैवा ! न कांहिं तुज वाटत चालवाया।

वाया पुन्हां करिशि यत्न मला हंसाया ॥

आशा अशा करिशि पूर्ण सदैव भग्न।

आतां फंसेन न करीन मुळीं न लग्न ॥ ४ ॥

आता करीन सगळ्यासच नापसंत।
होईन संयत मुनींद्र महंत संत।
स्वर्गांतुनी उतरल्या जरि अप्सराही ॥
राहीन मी दृढ, न चित्त चळे जराही ॥ ५ ॥ (पाऊल वक्र करु नां शकती जरा ही)

ग्वाल्हेर इंदुर पुणें मग नागपूर।
मी सर्व अर्ज झिडकारित नित्य दूर ॥
चिनू की ठकी बकु सकू अशि नाम - माना।
ऐकून दुप्पट मला मग चेव आला ॥ ६ ॥

केला  जरी सुदृढनिश्चय ब्रम्हचर्या 1
झाली सदैव मम दैनिक दीन चर्या ॥
मी थोपवून धरिले जरी जरि इंद्रियांना ।
नाना मनांत उठती नव- भाव माना ॥ ७ ॥

आल्या मुली, चमकल्या हृदयावकांशीं।
वाटे फसेन नं  कधीं मुळिं प्रेमपाशीं ॥
आणीत  पूर्ण अवसान दिसावयाला।
लागे परी मग मना मन खावयाला ॥ ८ ॥

रानांतल्या मृगमृगी शुकसारिकांना ।
कुंजातल्या युगल - मीलन - कूजनांना ॥
खेडयातल्या घरधनी धनिण वचांना ।
पौरांचिया प्रणयपूरित याचनांना - ॥ ९ ॥

डोळ्यांतल्या सरसरा शर चालण्यांना ।
पक्ष्यांचिया भ्रुकुटच्या मृदु नाचण्यांना ॥
वाणींतल्या अमृत गर्भित जल्पनांना ॥
संगीत तत्पर सुकङ्कण पैजणांना - ॥ १० ॥

भूमी तरुवरील सुंदर शावकांना ।
अस्पष्ट बाल वचनांतिल भावनांना ॥
ऐटींत जात असतां नवऱ्या मुलांना ।
पाहून सुंदर सुखी जगिं जोडप्यांना - ॥ ११ ॥

. नाना मनी स्फुरति कोमल गोड भाव ।
प्रेमात्म गीत रव दावितसे प्रभाव ॥
झाली नवीन मम मानस दिव्यदृष्टि ।
पाहीं पुढें सुपरिवर्तित सर्व सृष्टि ॥ १२ ॥

झाली सुरु त्वरीत सुंदर स्वप्न लीला ।
धुंडीत मी जगतिं प्रेमल  मूर्त - लीला ॥
कोठें जगीं मज दिसे नच प्रेमला ती ।
पाहूं कुठे कशि दिसेल अहा मला ती !! ॥ १३ ॥

लागे चितारू मन चित्र तिचें सुचारू ।
गंभीर भीम जलधीतिल भाव तारू ॥
होतां शरीरिणि मनांतिल ती सजीव ।
झालीं पुढें उभय प्रेमळ एक - जीव ॥ १४ ॥

## वसंत - लक्ष्मी विवाह

**(नारायण स्वरूपी वसन्त माधव वर आणि सृष्टिसुंदरी वधू ह्या सुंदर जोडप्याच्या लग्नांत कोण सुहृदय सामील होणार नाहीं!)**

निद्रित भगवन्नारायण जणु सत्त्वर खडबडुनी उठला।
असुनि एक मग अनेक व्हाया नूतन हेतू मनिं धरिला॥
संकल्पिंत नवजीवन अंशें अणु अणु मध्यें प्रभु नटला।
वसन्त माधव ऋतुवर रुपें नारायण जगिं अवतरला॥
विहरला प्रभु स्थिर चर मानसिं प्रगटवि अभिनव जीव कला।
बहरले तरु फुलल्या वेली नवपरिमल मनिं दरवळला॥
नव पल्लव भूषित हर्षित वेली रोमाञ्चित तनु तरु दिसती।
नवी नेसलीं हिरवी वसनें निसर्ग भूषण लखलखती॥
उघडुनि अपल्या कुसुम लोचना सगळे टक टक टक बघती।
प्रभात होता रविकर भर जरि शेले अर्पण जणुं करिती॥
पांघरती व्रततीत ति त्यांला वर्हाडि मंडळि जणुं सजती।
वसन्तमाधव लक्ष्मीलना मञ्जुळ कुञ्जीं डुलडुलती॥
उधळी गगनोद्यान फुलें रवि पडतीतीं त रु लता शिरीं।
अथवा पडली सहृदय हृदयीं सुरभि सुकवनें निघति तरी॥
कवनें झरझर निर्झर शय सम अभिनव मङ्गल रव करिती।
मङ्गल गानीं जणुं खगवृन्दें सगळीं  दिसतीं किति रत तीं॥

जिकडे तिकडे मङ्गल समयीं कोकिल मञ्गल रव घुमती ।

नैसर्गिक किति वाद्यें वाजति ध्वनि ' शुभ- मंगल' दुम दुमती ॥

सुराङ्गना गगनाङ्गणि भगिनी घेती दीप रवि करीं करा ।

उभ्या राहिल्या दिग्ललना वा ओंवाळाया वधू वरा ॥

म्हणते सारी मङ्गलसृष्टी मङ्गल होवो वधू वरा ।

लक्ष्मी नारायण स्वरूपी मङ्गल होवो वधू वरा ॥

प्रेक्षक प्रेमळ मङ्गल दृष्टी अक्षत संतत पडो वरी ।

भूसुर सुर वा सुराङ्गना चे उद्धृतकर युग युगल शिरीं ॥

नवसुम परिमल समयश पसरों वधूवराचें दिगन्तरीं ।

मङ्गल धामीं मङ्गलनामीं वसो निरन्तर सदन्तरीं ॥

स्वरसंगत गीतें एक नादता एकतानता मनीं भरो ।

एक सुराच्या मधुरमीलनीं कर्कश कटु रव विविधनुरो ॥

एकरूपता एकभावता विविध विषयिं मग संचरती ।

द्वेते भावना मङ्गल लग्नीं समरस हृदयान्तरिं विस्रली ॥

—-----

# आवेग

**(निरनिराळे तीव्र दुःखाचे प्रसंग आल्यामुळें भग्न झालेल्या हृदयाच्या क्षुब्धतेचें चित्र ह्या कवितेत वर्णिलें आहे)**

असें का होते हें किमपि न सुचे कांहिं मजला ।
विचारांचा कोलाहल मनिं अविछिन्न उठला ॥
हवें जें जें मातें सकळ जवळीं येथ दिसतें ।
तरीही चित्ताची तळमळ न कांही विरमते ॥ १ ॥
कसें सांगू आतां मज अगदिं कांहीं न वदवे ।
कसें मागूं कोणा हृदय - अभिलाषा न कळवे ॥
मनाच्या रोगाचा जगिं कुणि भिषग्वर्य कळवा ।
चिकित्सेला त्याचें मन कुणि तरी अल्पवळवा ॥ २ ॥
मनोरोगा येना समुळ शमवाया जरि तया ।
निदानानें नेवो हुरहुर निदानीं तरि लया ॥
कसें  सें होते हें मृदुल हृदयीं शल्य रुततीं ।
अशा क्षोभें वाटे हृदय तटिं चे कोट फुटती ॥ ३ ॥
आशा आवेगानें ' दलितमिव वज्रस्य हृदयम्' ।
अशा वेळीं ज्योत्स्नामय अनलि भाजे 'तनुरियम् ' ॥
स्फुलिंगें नक्षत्रें वरवरि जणूं वर्षति वरी ।
सुगन्धिवायूच्या झळझळती ज्वालाग्निलहरी ॥ ४ ॥

शिशूंची बालांचीं कुसुमवदनें फुल्ल हंसरीं ।

उरीं चाले त्यांचीं अधर दल पातीं जणु सुरी ॥

बुडो वाटे जावो मम हृदय गाढांध तमसीं ।

तिथें विश्रामला सहज मिळवो ते समरसीं ॥ ५ ॥

घडो गंभीराब्धि क्षुभित लहरी मज्जन मला ।

तरङ्गाची ठावी मज तरितटास्फालनकला ॥

बुडोमी स्वच्छंदें धगधगित दावाग्नि हृदयीं ।

मनःसंतापाच्या अवगत मला सर्व सवयीं ॥ ६ ॥

भयाचीं दृश्यें भी बघुनि हंसलों तीं हि हंसलीं ।

मला काळाच्या त्या विवृत वदनीं शांति दिसली ॥

ममाशेचे तंतू तुटति, तुटले बंध सगळे ।

निराशेनें माझें हृदयगृह झालें खिळखिळे ॥७ ॥

धरा माते, मानें लपवि अपल्या खोल हृदयीं ।

मना तेथें शांती  मज मग मिळो पूर्ण विलयीं ॥

पुरें झालें ! झाले हृदय फुटलें शीर्ण शतधा ।

सदा दैव क्रीडा विविध असती क्रूर बहुधा ॥ ८ ॥

# टीकाकारास विनंति

. टीकाकारा आवर टीका कृपाकरी मजवरी ।
नको तव खरी प्रखर वैखरी
दृष्टि तुझी अनलास वर्षकी कोमल कुसुमान्तरीं ।
करपुन जातिल हीं पहा तरी तूं
हृदयाचे अतिकोमल तंतू तूंबध तुटती किं रे
सर सर खर तर नजरतव फिरे
सतार हळु हळु वाजवितां ताना भरती मनीं
गगनिं घुमति रव मृदु अनुरणनीं
वज्राघातें तुटतिल तारा तारा गगनांतिल
स्वर्गिय संगीत लयिं जाइल
वादामध्ये नाद निघे कधिं लागे कर्णा कटु
मृदुमानस बंध लागति तुटू
टिकाव धरिती कोणी कोणी वितळति कुणि थिजती
जगीं भिन्न भिन्न रुचि धृती रति
म्हणुनि थांबव विघटनात्मिका प्रलयांतिल विकृति ।
भीमा कृति धनावरि धनतुल्य तवकृति
तशीच बाबा उपसंहर तव किति लांबली चपला
तळपुनि तव मति करपळी  मला

.—----

Page 179  Torn

रवि करिं तिज अनुतापें तपुंदे ; तपुंदे अचलोदरीं ।

सुलाखुनि तपात उजळो बरी ॥

तिमिर चया वरी प्रहार हळु हळु बघ सहस्र कर करीं ।

कसा बघ हळु हळु  वर ये शिरीं ।

तूं तर मतिवर म्हणवि शि अपणा बघशि पण वर वर तू ।

रविकर लीला बघ तर वर तू ।

अरुणा पाठवी, उषेस , मृदुल कर रवि पसरी ॥

Incomplete

_—---

